# धार संस्थानचा

संक्षिप्त

# प्राचीन इतिहास

आणि

## धार व मांडव येथील स्थलांचें वर्णन.





हा ग्रंथ

**शिवराम काशीनाथ ओक,**

अकाउन्टस ऑफिस, धार

यांनीं

**इतिहास संशोधक काशीनाथ कृष्ण लेले**

माजी विद्याधिकारी संस्थान धार व देवास

यांचे सहाय्यानें तयार केला.

---

सन १९१९.

---

हा ग्रंथ मुख पृष्ठ अनुक्रमणिका व पहिली पृष्ठें ३२
भास्कर श्रीधर चोघुले यांनीं सी. एन. प्रेस
६२१ गिरगांव येथें व बाकी सर्व चिंतामण
सखाराम देवळे यांनीं मुंबईवैभव प्रेस
संढर्स्ट रोड मुंबई येथें छापिला
तो शिवराम काशिनाथ ओक
यांनीं संस्थान धार येथें
प्रसिद्ध केला.

# अनुक्रमणिका.





श्री

# प्रस्तावना.

धारचा इतिहास पुष्कळ कारणांनीं अत्यंत महत्वाचा, बोधप्रद व मनोरंजक आहे. प्राचीन, मध्य कालीन, आणि अर्वाचीन हीं तीनही अंगें या इतिहासाला विचित्रता आणि-तात. धारच्या प्राचिन इतिहासास परमार कुलोत्पन्न परम विख्यात आणि रणवीर, दानवीर व विद्यावीर यांत अग्रणी भोजदेव याच्या मनोहर चरित्रानें शोभा आणिली आहे. मध्यम कालांत म्हणजे मुसलमानांच्या आमदानींत मांडवगडाची तटबंदी होऊन त्यांत मोठाल्या टोलेजंग मशीदी, राजवाडे, मुकरबे बांधले जाऊन पृथ्वीवरील विशाल व आजिंक्य दुर्गांत त्यांची गणना होऊं लागली. तिसऱ्या भागांत मराठे शाहीचा उदय होऊन जुन्या परमारांचे वंशज महाराष्ट्रीय पवार यांची गादी सुमारें पाचशें वर्षांनीं धारानगरींत अपूर्व दैवयोगानें पुनरपि कायम झाली.

२. धारचा इतिहास लिहविण्याची इच्छा प्रथम श्रीमंत कै. महाराज आनंदराव पवार साहेब यांस होऊन त्यांनीं तें काम पंडितवर्य कै. वामन शास्त्री इसलामपूरकर यांजकडून करविण्याचें ठरविलें होतें. इतक्यांत सन १८९८ इ. सालीं महाराज साहेब स्वर्गवासी झाले. त्यांचे वारस **श्रीमंत, उदाजीराव महाराज** अल्पवयीं असल्यामुळें राज्याची देखरेख सार्वभौम सरकाराकडून रावबहादूर कृष्णराव वासुदेव मुळे यांजकडे सांगण्यांत आली. त्यांनीं कै. महाराजांच्या इच्छेस मान देऊन तें काम पंडित वामनशास्त्री यांजकडूनच करविलें. तज्ञ पंडितांस त्यांचा ग्रंथ पसंत न झाल्यामुळें तो प्रसिद्धीस आला नाहीं.

३. पुढें दोन तीन वर्षांनीं सेंट्रल इंडिया व त्यांतील संस्थानांचीं ग्याझेटियरें ( सर्व सामान्य माहितीची पुस्तकें ) तयार करविण्याचें काम मेहरबान लुअर्ड साहेबांच्या देखरेखीखालीं सुरू झालें. त्याप्रसंगीं धारसंस्थानच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहासाचीं विस्तृत टिपणें मी इंग्रजींत तयार केलीं तीं मेहरबान लुअर्डसाहेबांस पसंत पडलीं. परंतु ग्याझेटियरच्या योजनेंत त्यासर्वांस स्थल मिळणें शक्य नसल्यामुळें; त्यांपैकीं प्राचीन परमारांचा भाग मात्र त्यांनीं दुरुस्त व संक्षिप्त करून धारच्या ग्याझेटियरांत परिशिष्टरूपानें प्रविष्ट केला व बाकींची प्रकरणें तशींच मजजवळ राहिलीं.

४. अलीकडे इतिहासाच्या साधनाचा संग्रह करण्याचें काम सर्वत्र सुरु झालें आहे. त्याप्रमाणें जुनीं कागदपत्रें व दाखले यांची तपासणी होऊन धारचा इतिहास संगतवार व खात्रीलायक लिहिला जावा असें मनांत आणून धार दरबारांनीं तें काम मजकडे चारपांच वर्षांपूर्वी सांगितलें व तें काम मी अनुकूलतेप्रमाणें यथाशक्ति व यथामति करीत आहें.

५. गुदस्तसालीं धार येथील हिंदी शाळेचे हेड मास्तर पंडित नंदकिशोर दुबे यांनीं धार राज्याचा संक्षिप्त इतिहास धार दरबारच्या आश्रयानें छापून प्रसिद्ध केला. परन्तु तो हिंदीत असल्यामुळें मराठी वाचकांस तादृश उपयोगी पडण्यासारखा नाहीं.

६. माझे मित्र राजश्री **शिवराम काशीनाथ ओक** यांस या विषयाची गोडी फार दिवसांपासून आहे. त्यांनीं वेळोवेळीं ऐतिहासिक टिपणें करून ठेविलीं आणि त्यांत आमच्याजवळ व इतरत्र नवीन उपलब्ध झालेल्या माहीतीची भर ते टाकीत गेले. आणि या साधनांवरून लवकरच एक धारचा इतिहास तयार करावा असें आमचे मनांत घोळत होतें. इतक्यांत एकाएकीं त्या बेतास मूर्त स्वरूप देण्याची संधि येऊन धडकली. आणि अडचणींस न भितां ती साधल्यास साधावी, असा आमचा उभयतांचा निश्चय झाला.

७. यंदाची मराठा शिक्षण परिषदेची बैठक पुढील महिन्यांत लष्कर येथें व्हावयाची होती. परंतु कांहीं अकल्पित कारणामुळें तो बेत रहित होऊन ती बैठक धार येथें होण्याचें गेल्या महिन्यांतच एकाएकीं ठरलें. अशा विद्वत्परिषदेच्या बैठकीच्या वेळीं पाहुण्यांच्या माहीती करितां इतिहासाचें संक्षिप्त पुस्तक तयार झाल्यास उत्तम होईल, असा विचार माझ्या व रा. ओक यांच्या मनांत आला. माझी प्रकृती इन्फ्लुएंझाच्या आजारानें अशक्त झाल्यामुळें सर्व ओझें एकट्या ओकांवर पडलें. त्यांनीं खर्डे तयार करून ते मला दाखविण्याचें काम सुरू केलें. आणि रात्रंदिवस अविश्रांत मेहनत करून दहा बारा दिवसांत जेमतेम परमारांचा व मुसलमानांचा भाग आणि स्थल वर्णन व सामान्य माहितीचीं टिपणें तयार केलीं. अर्वाचीन भाग लिहिण्यास वेळच राहिला नाहीं. सबब तो वगळून बाकीचा भागच या शुभ प्रसंगाकरितां तयार करण्याचें ठरविलें.

तो छापविण्या करितां खुद्द रा. ओक यांसच मुंबईस जावें लागलें. त्यांनीं अतिशय मेहनत करून घाईनें खरडा तयार केला, म्हणून त्यांत घाईचीं चिन्हें पुष्कळच आहेत. परन्तु वेळ साधण्याचें मुख्य धोरण पुढें ठेवल्यामुळें बारीकसारीक दोषाकडे कानाडोळाच करावा लागला.

हें संक्षिप्त इतिहासाचें पुस्तक इतिहासप्रिय सामान्य वाचकांच्या उपयोगाकरितां मुख्यत्वें तयार केलें आहे. तथापि त्यांतील कांहीं तपशील वगळून त्याचा उपयोग विद्यार्थ्यांस करून देण्याजोगा आहे.

८, या पुस्तकांत पुष्कळ फोटो, चित्रें वगैरे घालून शोभा आणण्याचा उद्देश होता. परन्तु रात्र थोडी व सोंगें फार या कारणानें तसें करतां आलें नाहीं. यास शेवटीं सुचीही

जोडण्याचा विचार होता, तोही साधला नाहीं, अस्तु. यांतील न्यूनतांकडे दुर्लक्ष करून, यांतील ग्राह्यांश तेवढा आमच्या इतिहासप्रिय बंधूस मान्य होवो. दुसऱ्या आवृत्तीचा योग आल्यास त्यावेळीं सर्व न्यूनातिरेकांची दुरुस्ती करण्यांत येईल.

९. या पुस्तकाचा विशेष गुण म्हटला म्हणजे हा आहे कीं, त्यांतील बहुतेक विधानांचे आधार जेथल्या तेथें यथासंभव दाखविण्यांत आले आहेत. ह्यांत कांहीं गुणलेश असल्यास त्याचे पूर्ण यश धार दरबाराचे आणि संस्थानचे गुणज्ञ अधिपति **श्रीमंत महाराज सर उदाजीराव पवारसाहेब बहादूर के. सी. एस. आय., के. बी. ई.** यांचें आहे. कारण त्यांचे सतत प्रोत्साहनाशिवाय इतिहास संशोधनासारखें चेंगट व कंटाळवाणें काम कधींही वर्षानुवर्षे चाललेंच नसतें. धारेसारख्या प्रतिकूल परिस्थितीच्या गांवांत जीं विद्यावृद्धीचीं चिन्हें सर्वत्र दिसत आहेत त्याचें मूळ कारण श्रीमंत महाराज साहेब यांची विद्यावृद्धीविषयीं अभिरुचीच होय. किंबहुना अशा प्रतिकूल परिस्थितींत आयत्या वेळीं मराठा शिक्षण परिषदेच्या बैठकीचें जोखमीचें व जबाबदारीचें काम त्यांनीं दृढ निश्चयानें व धैर्यानें अंगिकारलें; हेंही श्रीमंत महाराज साहेब यांच्या आंगच्या वरील गुणांचेंच निदर्शक आहे.

१०. या पुस्तकांत प्राचीन परमारांचे व मुसलमानांचे इतिहासाशिवाय गॅझेटीअरसारख्या पुस्तकांत किंवा मार्ग दर्शिका ( Guides ) रूप पुस्तकांत जी माहिती दिली जाते तिचाही संग्रह केला आहे. कारण लहान संस्थानांत अशा निरनिराळ्या विषयावर निरनिराळीं पुस्तकें असण्याचा संभव कमी, म्हणून या सर्व उपयुक्त माहितीचा संग्रह याच एका पुस्तकांत करणें अवश्य व बरें वाटलें.

११. अवसराचे अभावामुळें हल्लींच्या पवार घराण्याचा इतिहास आतांच संकलित करतां आला नाहीं, याबद्दल दिलगिरी वाटते. तथापि तोही लवकरच तयार करून सादर करण्यांत येईल. मात्र जिज्ञासू वाचकांकरितां हल्लींच्या पवार राजघराण्याचा वंशवृक्ष या सोबत दिला आहे.

शेवटीं एकवार प्रेरक श्रीमंत महाराज साहेब बहादूर यांचें अभीष्ट चिंतन मनोभावें करून सहायक वर्गाचे आभार मानून, आणि ही घाईघाइनें तयार केलेली भाजीभाकर गोड करून घ्यावी, अशी वाचकवर्गास विनंती करून नम्रभावानें मी रजा घेतों.

धार,<br>ता. २३।११।१९.

**काशिनाथ कृष्ण लेले.**

# हद्दत.

जगच्चालक प्रभूच्छा इच्छेनेंच कोणत्याही कार्याची स्फूर्ति होते आणि अखेरीस तें कार्यही तोच "सत्य संकल्पाचा दाता" पार पाडतो. त्याप्रमाणेंच या कामाचेंही झालें आहे. आज कित्येक वर्षांपासून कांहीं तरी स्वभाषासेवेच्या द्वारें सरस्वतीदेवीची आराधना हातून घडावी, तसेंच ज्या अधिपतींच्या आश्रयाखालीं आपण राहत आहों त्यांची ही अल्पशी तरी चाकरी आपले हातून व्हावी, असें मनांतून फार वाटत होतें. आणि अशी हीं दोन्ही कार्यें एकदम साधण्याच्या हेतूनेंच प्रथमतः धारसंस्थानचा लहानसा इतिहास व येथील ऐतिहासिक स्थलांचे वर्णन लिहिण्याचा संकल्प सुमारें ६।७ वर्षांपूर्वी झाला.व त्याप्रमाणें कामासही आरंभ केला गेला होता. परंतु मध्यंतरी कांहीं कारणानें तें काम तसेंच पडून राहिलें.

हल्लीं धार येथें अनायासें मराठा–शिक्षण–परिषदेची बैठक होण्याचें एकदम ठरलें तेव्हां अशा विद्वत्परिषदेचे वेळीं वरील प्रकारचें एकादें पुस्तक जरूर हवें आहे, तें फार उपयोगी होईल, अशी सूचना इतिहास संशोधक रा. रा. **काशीनाथ कृष्ण लेले** माजि विद्याधिकारी संस्थान धार व देवास यांजकडून झाली, तेव्हां लागलीच कामास आरंभ करून अल्पबुद्धी प्रमाणें धारसंस्थानचे प्राचीन इतिहासाचा व स्थल वर्णनाचा भाग तयार करून सादर केला आहे.

हा भाग तयार करण्याचे कामीं गुरुवर्य **काशीनाथ कृष्ण लेले** यांचे मला फारच सहाय्य झालें आहे. धारच्या इतिहासासंबंधानें त्यांनीं जीं टिपणें वगैरे तयार केलीं आहेत. त्यांचा मनसोक्त उपयोग मला करवयास मिळाला, याबद्दल व त्यांनीं प्रकृती अस्वस्थ असतांनांही तयार झालेला भाग पाहून वेळोवेळीं सूचना व दुरुस्त्या फार परिश्रम घेऊन करून दिल्या, याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें.

तसेंच याकामीं मला धार येथील आणखीही कांहीं मंडळींचें सहाय्य झालें आहे त्याबद्दल त्यांचाही मी फार आभारी आहें व त्याप्रमाणेंच दादर व मुंबई येथील ज्या सद्गृहस्थांनीं या पुस्तकाचे मुद्रणाचे कामीं परिश्रमपूर्वक सहाय्य केलें त्यांचाही मी अत्यंत ऋणी आहें.

हें काम अत्यंत घाईनें म्हणजे साऱ्या १५–१६ दिवसांचे अवधींत झालें असल्यानें यांत दोष राहणें हें अगदीं साहजीक आहे, तेव्हां या पुस्तकांत वाचकांस जे कांहीं दोष किंवा चुका आढळतील त्या त्यांनीं मेहरबानी करून मला कळविल्यास मी त्यांचा फार आभारी होईन; व त्यांची दुरुस्ती दुसऱ्या आवृत्तीचा प्रसंग आल्यास मोठ्या आनंदानें करीन.

शेवटीं, आमचे परम दयाळु अधिपति **श्रीमंत महाराज सर उदाजीराव पवार साहेब बहादुर, के. सी. एस्. आय्., के. बी. ई.** यांनीं ही त्यांच्या सेवकानें यथामति बजाविलेली चाकरी मान्य करून घ्यावी अशी अत्यंत नम्रभावानें विनंति करून ही अल्पशी वाङ्मयी सेवा त्या परमपूज्य सरस्वती देवीस मान्य होवो आणि तिचे भक्तांचे आदरास पात्र होवो अशी त्या **प्रेरक व सकलेच्छापूरक दयाघन जनार्दनाची** प्रणाम पूर्वक प्रार्थना करून, हें माझे हेतुनिदर्शक हद्दत पुरें करितों.

मार्गशीर्ष शुद्ध ८ चंद्रवार शके १८४१<br>ता. १ डिसेंबर १९१९ इ.

नम्र सेवक,<br>**शिवराम काशीनाथ ओक.**

# धार संस्थानची सामान्य माहिती.

**नाम व स्थान निर्देश.** मध्यहिंदुस्थानांत लहान मोठीं सुमारें ७०–७५ संस्थानें असून त्यांत जीं ११ संस्थानें प्रमुख आहेत, त्यापैकींच धार हें एक महाराष्ट्रीय संस्थान आहे. हें संस्थान उत्तर अक्षांश २१–५७ व २३–१९ आणि पूर्व रेखांश ७४–३७ व ७९–३७ यांमध्यें आहे. या संस्थानाचे हल्लींचे **अधिपति श्रीमंत महाराज सर उदाजीराव पवार साहेब बहादूर के. सी. एस. आय्., के. बी. ई.** हे आहेत. या संस्थानचे मुख्य राजधानीचें ठिकाण धार हें असल्यानें यास धार संस्थान असें ह्मणतात.

**क्षेत्रफळ.** या संस्थानचें क्षेत्रफळ सुमारें १७७५ चौरस मैल आहे, यांतच संस्थानांतील मांडलिक ठाकूर व भूमिये यांचे मुलखांचाही समावेश होतो.

**लोकसंख्या.** या संस्थानची लोकवस्ती इ. स. १९११ च्या मनुष्यगणती प्रमाणें १९३२६५ आहे. व संस्थानांत एकंदर गांवांची संख्या ६७० आहे.

**मर्यादा.** या संस्थानचे उत्तरेस रतलामचें राज्य, दक्षिणेस बढवाणी संस्थान व इन्दूरचे राज्याचा कांहीं भाग, पूर्वेस होळकर व शिंदे यांचे राज्यांतील कांहीं मुलख व पश्चिमेस झाबवा संस्थान व होळकर व शिंदे यांचे राज्याचे कांहीं भाग आहेत.

स्वाभाविक विभाग.

विंध्याद्रि पर्वताचे योगानें या संस्थानचे स्वभावतःच दोन भाग झालेले आहेत. उत्तरेकडील भाग माळव्यांत असून उंचवट्यावर आहे व चांगला सुपीक आहे. दक्षिणेकडील भाग नेमाडांत असून पुष्कळ सखल आहे. या उंचवट्यावरील भागाची समुद्रसपाटीपासून सरासरी उंची कमींत कमी १५०० व जास्तींत जास्ती २५०० फूट आहे व दक्षिणेकडील सखल भाग समुद्र-सपाटीपासून सुमारें ८०० फूट उंच आहे.

खजिन संपत्ति.

या संस्थानांत खनिज संपत्ति फारशी नाहीं.

जमीन.

माळव्यांतील जमीन बहुतकरून भुसभुशीत काळी किंवा कोठें कोठें जमीन चिकण मातीची आहे व नेमाडांतील बहुतेक जमीन कांहींशी डोंगराळ आहे, तथापि दोन्ही भागांतील जमीन चांगली सुपीक आहे. त्यांत नेमाडांतील नर्मदेचे कांठचा भाग उत्तम सुपीक आहे. माळव्यांतील जमिनीचें क्षेत्रफळ ८६९ व नेमाडांतील जमीनीचें ९०६ चौरस मैल आहे.

हवामान व पाऊस.

माळव्यांतील व नेमाडांतील हवामान अगदीं निरनिराळया तऱ्हेचें आहे. माळव्यांतील हवा सौम्य असून येथें उन्हाळा विशेष नसतो. परंतु नेमाडांतील हवा उष्ण असून तेथें उन्हाळा बराच कडक असतो. माळव्यापेक्षां नेमाडांत पाऊसही कमी पडतो. माळव्यांत सुमारें सरासरीनें ३० इंच पाऊस लागतो इतक्या प्रमाणांत नीट बेताबेतानें वेळशीर पाऊस पडला ह्मणजे दुष्काळाचें भय राहत नाहीं, व पाण्याचाही पुरवठा बेताचा राहतो. एकंदरींत या भागांतील हवामान लोकांचे प्रकृतीस मानवणारें आहे.

नद्या व तलाव वगैरे.

नर्मदा हीच एक मोठी नदी संस्थानांतील नेमाड प्रांतांतून सुमारें ५० मैल पर्यंत वहात गेली आहे. तिला मिळणाऱ्या लहान लहान कांहीं शाखाही आहेत परंतु त्या विशेष महत्वाच्या नाहींत. निमनपूर परगण्यांत धारडी येथें नर्मदा नदीचा मोठा धबधबा असून तेथें पुष्कळसे भोवरे आहेत त्यांत सुंदर बाण सांपडतात तेथें पानबुडे आहेत, ते कांहीं पैसे घेऊन भोवऱ्यांत बुडया मारून बाण काढून आणून देतात. नर्मदेची धार उंच कडयावरून खालीं उडी टाकते यावरून धारडी हें नांव पडलें असावें. धरमपुरी गांवाजवळ नर्मदा नदींत एक बेट आहे, त्यावर श्री बिल्वामृतेश्वर महादेवाचें एक रमणीय प्राचीन स्थान आहे. त्याचें नांव रेवाखंडांत आलें असून तेथें रंतिदेव राजानें यज्ञ केला असें वर्णन आहे. या देवस्थानास संस्थान कडून कांहीं जहागीर असून देवस्थानाचा सर्व खर्च जहागिरीचे उत्पन्नांतून होतो. चम्बळ नदी ही या संस्थानचे पूर्व बाजूनें वहात जाऊन पुढें यमुनेस मिळाली आहे.

धारेचे आसपास व मांडव आणि नालाछा यथच काय ते बरेचसे तलाव आहेत शिवाय दुसऱ्या बऱ्याच लहान नद्याही संस्थानांतून वहात गेल्यानें संस्थानांत पाण्याची बरीच विपुलता आह.

पर्वत.

संस्थानांतून मुख्यत: नर्मदेचे अलीकडे विंध्याद्री व पलीकडे सातपुडा पर्वताचे भाग आले आहेत. शिवाय ठिकठिकाणी लहान लहान डोंगर व टेकडयाही आहेत.

जंगलें.

विंध्याद्री पर्वतांतील भागांत बऱ्याच ठिकाणीं व नर्मदेचे किनाऱ्यावर कांहीं ठिकाणीं चांगलें जंगल आहे. निमनपूर परगण्यांतील जंगल तर पुष्कळच मोठें असून " धार फारेस्ट " नांवानें प्रसिद्ध आहे.

या जंगलांतून चित्ते, वाघ, तरस, रानडुकरें, रान म्हैसे, जंगली कुत्रे, वगैरे पुष्कळ हिंस्त्र पशु असून दुसरे हरीण, सांबर वगैरे वन्य पशूही आहेत. त्यामुळें शिकारीचे शोकीन लोकांस शिकार खेळण्यास चांगली सोय आहे.

वरील जंगलांत पुष्कळ तऱ्हेचें इमारती लाकूड पैदा होतें. त्यांत विशेषतः साग, अंजन वगैरे लाकूड चांगलेंच होतें.

नेमाडांतील गुरें ढोरें दिसण्यांत फार सुरेख, आंगा पिंडानें मोठीं व

गुरें ढोरें. दुधदुभत्यांतही माळव्यांतील गुरांपेक्षां चांगलीं असतात.

संस्थानांत बहुतेक सर्वत्र गहूं, तांदूळ, हरभरे, ज्वारी, मका, तूर वगैरे

धान्य वगैरेची पैदास. सर्व प्रकारचीं धान्यें पैदा होतात. त्यांत विशेषतः संस्थानचे माळव्यांतील कांहीं भागांत गहूं फारच उत्तम होतो. शिवाय ऊंस, तंबाखू, हळद, लसूण, भुयमुग, तीळ, जवस वगैरेचीही पुष्कळ पैदास केली जाते. पूर्वी अफूचें उत्पन्न फार होतें, परंतु हल्लीं अफूची लागवड बंद करण्यांत आली आहे. नेमाडांत कापूस पुष्कळ व चांगला पिकतो.

गुराढोरां प्रमाणेंच नेमाडांत पैदा होणारीं धान्यें माळव्यांतील धान्यापेक्षां दिसण्यांत मोठीं व कसदार असतात. हाच फरक माळव्यांतील व नेमाडांतील लोकांतही नजरेस पडतो. नेमाडांतील लोक धिप्पाड काटक व मेहनती असतात. तितके माळव्यांतील नसतात. एकंदरीत हा जमीनीचा व पाण्याचा गुण आहे.

जमीन बाब, जंगल, टांका, आबकारी, व इतर बाबीमिळून संस्थानचें

संस्थानचें उत्पन्न. उत्पन्न सरासरी १४ लक्ष रुपये आहे.

राज्य कारभाराचे सोईसाठीं संस्थानचे भाग ठरविले आहेत. त्यांस महाल (परगणे) असें ह्मणतात. असे परगणे ७ आहेत. त्यांचीं नांवें:—धार, बदनावर, धरमपुरी, कुक्षी, निमनपूर, मांडव आणि सुंदरसी.

राजकीय विभाग.

महालावरील रेव्हेन्यू अधिकाऱ्यास बहुतकरून कमाविसदार हा हुद्दा आहे. कमाविसदाराचें आफिस बहुतकरून महालचे मुख्य गावीं असतें व त्या गांवाचे नांवावरूनच बहुतेक महालास (परगण्यास) नांवें दिलीं आहेत.

संस्थानांत कांहीं जुने रजपूत जहागिरदार असून ते बहुतेक बदनावर परगण्यांत राहतात त्यांजकडून दरबारास दरवर्षी टाक्या बद्दल सुमारें ७६९०० रुपयांची रक्कम मिळते. याप्रमाणेंच धरमपुरी व धार परगण्यांत कांहीं भूमिये आहेत त्यांजकडूनही संस्थानास टाका मिळतो. बदनावर परगण्यातील टाकेदार ठाकूरांचीं नांवें खालीं दिलीं आहेत.

संस्थानचे टाकेदार ( मांडलीक. )

१ मुलथान, २ काछीबडोदा, ३ बखतगड, ४ दोत्र्या, ५ कोद, ६ बिडबाळ, ७ बेरछा, ८ मांगळ्या, ९ वठोड्या, १० मुंगेला, ११ धारसी खेडा, १२ मऌवाड्या, १३ पाना. यापैकीं पहिले ४ ग्यारंटीड असून बाकीचे नॉन ग्यारंटीड आहेत.

संस्थानांत प्रजेचे हितासाठीं व राज्य कारभाराचे सोईसाठीं पोलीसखातें, फौजीखातें, न्यायखातें, जेल, इंजिनियरी व म्युनिसिपालीटी ( शहरसुधराई ) वगैरेंचींही व्यवस्था आहे.

संस्थानातील इतर खातीं.

विद्याखात्याकडून संस्थानांत विद्यावृद्धीचे कामीं योग्य प्रयत्न होत आहेत.

लोकशिक्षण व विद्याप्रसार.

उच्चप्रतीचें शिक्षण मुख्यतः धार येथें दिलें जातें व त्यासाठीं येथें एक मोठें हायस्कूल ठेवण्यात आलें असून दुसऱ्याही मराठी, हिन्दी, उर्दू, संस्कृत वगैरे पाठशाळाही ठेविल्या आहेत. परगण्यांतील मुख्य मुख्य गांवांतून हिन्दी पाठशाळा ठेविल्या असून तेथें ४।५ इयत्तापर्यंत व कोठें कोठें थोडेसें इंग्रजी शिक्षणही दिलें जातें. याशिवाय मोठमोठ्या इतर गांवांतूनही प्राथमीक शिक्षणाची सोय तेथें शाळा ठेवून करून देण्यांत आली आहे. हें प्राथमिक शिक्षण मोफत दिलें जातें.

खेडे गावांतील विद्यार्थ्यांस धारेस राहून पुढील अभ्यास करितां यावा याकरितां वसतिगृहांची तजवीज करण्यांत आली आहे आणि वाचनाची गोडी लागावी ह्मणून मोठाल्या गांवीं पुस्तकालयें ठेविलीं आहेत. खास धार शहरीं मुलींच्या शिक्षणासाठीं पाठशाळा ठेवण्यांत आली असून तींत हिंदी व मराठी भाषेंत शिक्षण दिलें जातें.

परगण्याचे मुख्य गांवींही जरूरीप्रमाणें कांही ठिकाणीं अशा शाळा काढण्यांत येऊन स्त्रीशिक्षणाची व्यवस्था केली गेली आहे.

दवाखाने व आरोग्य.

प्रजेचे आरोग्यासाठीं हें खातें ठेविलें असून मुख्य हॉस्पिटल धार येथें आहे. तसेंच परगण्यांतील मुख्य मुख्य गांवीही दवाखाने ठेविले असून जरूरी प्रमाणें त्याशिवायही दुसऱ्या मोठमोठ्या गांवी दवाखान्याची व्यवस्था केली असल्यानें प्रजेची फार सोय झाली आहे. हल्लीं धार येथें ‘ एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटल ’ नांवाचें मोठें हॉस्पिटल बांधण्यांत आलें असून त्यांतून हल्लींच्या काळीं आवश्यक असलेल्या अशा पुष्कळ सुधारणा करण्यांत आल्या आहेत.

व्यापार व उद्योग धंद्यांची वाढ होण्यांकरिताही दरबाराकडून योग्य व्यवस्था होत आहे. २।३ वर्षांपासून येथें ओऱ्याच्या फुलाचे बरेच कारखाने निघाले आहेत व दुसरेही आणखी इतर कारखाने निघण्याची व्यवस्था चालली आहे. संस्थानांत उत्पन्न होणारे जिन्नस गहूं, कापूस वगैरे परदेशीं रवाना होतात. बऱ्याच ठिकाणीं जिनिंग कारखानेही निघाले आहेत. संस्थानांतील लोकांचा मुख्य धंदा शेतीचा आहे.

व्यापार व उद्योग धंदे.

संस्थानांत नुकतीच २।३ वर्षांपासून पंचायत पद्धतीही सुरू करण्यांत आली आहे. लोकांस तीपासून चांगलाच फायदा होईल.

पंचायत पद्धति.

याशिवाय जातवंत घोडयांची उपज होण्याकरितां एक रिमाउन्टचा कारखानाही दरबाराकडून थोडया वर्षांपासून काढण्यांत आला आहे व त्यावर आस्ट्रेलियांतील एका तज्ञाची योजना करण्यांत आली आहे.

रिमाउन्ट.

संस्थानांतून बॉम्बे आग्रारोड नांवाचा मुंबईपासून आग्र्यापर्यंत जाणारा रस्ता सुमारें २८ मैल (धरमपुरी व ठिकरी परगण्यांतून) गेला आहे. या रस्त्यास धारदुधीरोड नांवाचा रस्ता धारपासून निघून सुमारें ३० मैलावर दुधी गांवाजवळ मिळाला आहे. विंध्याद्रीचे घाटांतून या रस्त्यानें जातानां जंगलाचा देखावा फार रमणीय दिसतो. दुसरा महूनीमचरोड नांवाचा रस्ता धार व बदनावर परगण्यांतून सुमारें ३७ मैल गेला आहे. याच रस्त्यास लेबड गांवाजवळ धार लेबडरोड व नागदा गांवाजवळ धार नागदारोड हे रस्ते मिळतात. मांडवास जाण्याकरितां धार दुधीरोडवर लोगारा नांवाच्या

दळण वळणाचीं साधनें.

गांवाजवळ दुसरा रस्ता फुटतो तो नालछा गांवावरून थेट मांडवास गेला आहे. याशिवायही दुसरे लहान सहान रस्ते परगण्यांतून तयार केले गेले आहेत.

संस्थानांत अद्याप रेल्वे झालेली नाहीं. राजपुताना माळवा रेल्वे वरील महू व बडनगर हीं संस्थानचे हद्दीपासून जवळचीं स्टेशनें आहेत. हीं अनुक्रमें धारेहून ३३ व ४२ मैल आहेत. बडनगर स्टेशन बदनावराहून फक्त १० मैल दूर आहे.

रेल्वे स्टेशनपर्यंत जाण्यासाठीं किंवा मालाची ने आण करण्यासाठीं, गाड्या, तांगे, घोडीं, उंटें वगैरे साधनें संस्थानांत बहुतेक ठिकाणीं गांवाचे स्थितिमानाप्रमाणें मिळूं शकतात. हल्लीं दोन तीन वर्षांपासून धारेहून महूस जाण्याकरितां व महूहून धारेस येण्याकरितां ग्वालियर स्टेट कडून मोटार सर्व्हिस झाली आहे.

नर्मदेवर ठिकठिकाणीं नावघाट असून नावांचे साधनानेंही मालाची ने आण होते.

पोस्ट व तार आफिसें.

परगण्याच्या मुख्य गांवीं सर्व ठिकाणीं गव्हर्मेंटचीं पोस्ट आफिसें असून परगण्यांतील दुसऱ्याही मोठमोठ्या गांवीं तशींच पोस्ट आफिसें ठेवण्यांत आलीं आहेत. तसेंच खास धार, कुक्षी, धरमपुरी व बदनावर येथें तार आफिसेंही ठेवलीं गेलीं आहेत.

संस्थानांतील नाणीं.

संस्थानांत पूर्वीं इंदुरी किंवा उज्जयनी रुपये चालत असून संस्थानचें एक तांब्याचें नाणेंही चालत होतें हल्लीं सर्व ब्रिटिश इंडियांतील नाणींच संस्थानांत चालतात.

धर्म, पंथ व जाती.

संस्थानांत हिंदु, जैन, मुसलमान, ख्रिश्चन वगैरे सर्व धर्माचे, पंथाचे, जातीचे लोक आहेत. डोंगराळ प्रांतांतून व नेमाडांतून भील, भिलाळे, कोरकू वगैरे जातींचीही वस्ती बरीच आहे.

भाषा.

संस्थानांतील लोकांची मुख्य भाषा हिंदी असून मराठी, इंग्रजी, गुजराथी भाषाही अल्पप्रमाणानें प्रचारांत आहेत. हिंदी भाषेंतही माळव्याचे व नेमाडचे भाषेंत फरक आहे.

एकंदरींत संस्थानचें हवामान चांगलें असून लोक स्थिती व लोकांच्या सुखसोई वगैरेकडे दरबाराकडून चांगलें लक्ष दिलें जातें यामुळें प्रजा सुखी आहे.



# नकाशा संस्थानधार.

रतलाम
उज्जैन
इंदोर
देवास
महू
फतीयाबाद
बेडधा
लडावद
सुंदरसी
उज्जन भोपाळ रेलवे
दाहोद गोधरा रेलवे
आग्र्याला
मुलथान
बदनावर
कानवण
कोद
नागदा
गाडावद
आहू
धार
गुणावद
लेबड
सरदारपुराहून
नालछा
मांडव
कनवाडा
गंधवाणी
कुक्षी
टिंगाणा
धरमपुरी
खलघाट
बलखडा
टीकरी
बदवाणी
जुलवाण्या
नर्मदानदी
नर्मदा नदी
बागली
उदयनगर
पिपरी
निमनपूर
खांडवा

रंगाचा तपशील

| | |
|---|---|
| महाल बदनावर | |
| महाल धार | |
| महाल मांडव | |
| महाल धरमपुरी | |
| महाल कुक्षी | |
| महाल निमनपूर | |
| महाल सुंदरसी | |



स्केल एक इंचांत मैल
२४

Prepared by A.S.Vaidya & Co. Map Publishers: Bombay

SHRI KARUNESH P. PRESS. BOMBAY N34

श्री.

# धार संस्थानचा संक्षिप्त प्राचीन इतिहास.



## उपक्रम व विषय-प्रवेश.



भरत खंडाचे इतिहासांत माळव्याचें स्थान बरेंच महत्वाचें असून त्याची प्रसिद्धी फार प्राचीन काळापासून आहे. प्राचीन संस्कृत ग्रंथांतून या मालव देशाविषयीं ठिकठिकाणीं महत्व सूचक उल्लेख आढळतात. कांहीं काळपावेतों माळव्याची प्राचीन राजधानी उज्जयिनी ही तर भारत साम्राज्याची राजधानी समजली जात असे; व कित्येकवेळां ही मालवीय राजधानी हातीं आल्यावर येथील राजांनीं आपले नांवाचा शक चालविण्याचाही प्रयत्न केला आहे. यावरून भरतखंडाचे इतिहासांत माळव्याचें महत्व चांगलें लक्षांत येईल.

माळव्याचे मध्यकालीन इतिहासांत अवंति अथवा उज्जयिनीचे बरोबरीनें जर कोणत्याही स्थळाची विद्या व वैभवसंपन्नतेसंबंधानें प्रसिद्धी असेल तर ती धारेचीच, अर्थात् धार शहराची आहे. या स्थलाचा मुसलमानी आमदानी पूर्वीचा इतिहास तुटक तुटक अशा दंतकथांचे रूपानें लोकांत राहिला होता. परंतु हल्लीं प्राचीन संशोधकांचे प्रयत्नानें—त्यांस उपलब्ध झालेल्या शिलालेख, ताम्रशासनें वगैरे साधनांचे द्वारा—जी नवीन माहिती प्रसिद्ध झाली आहे व होत आहे तीमुळें दंतकथांतील कित्येक

गोष्टीवर नवा प्रकाश पडून स्मृतिशेष होत चाललेल्या इतिहासाचें अधिक उज्वल स्वरूप जनतेपुढें येत चाललें आहे. ही मोठी आनंदाची गोष्ट आहे.

प्राचीन संस्कृत वाङ्मयांत या स्थळाचा उल्लेख **धारनगरी** या नांवानें आढळतो. हें नांव या स्थळास मूळ कोणत्या कारणानें मिळालें असावें हें अद्याप नीटसें कळत नाहीं; तथापि धारा हें नांव 'असिधारा' अथवा 'खड्गधारा' या शब्दावरून पराक्रमाचें द्योतक ह्मणून प्रचारांत आलें असावें असें ह्मणण्यास जागा आहे. कदाचित् हें स्थळ विंध्याद्रि पर्वताचे धारेवर असल्यानेंही त्यास धारा असें नामाभिधान मिळालें असावें असें असल्यास तेंही नांव सार्थच आहे. मुसलमानी आमदानींत या स्थळास पीरान्धार असें ह्मणत असत हें मुसलमानी नांव विद्वत्तेचें द्योतक आहे ह्मणजे त्याकाळीं येथें विद्वान व अवलिया पुष्कळ होते. हल्लीं अशा तत्कालीन अवलियांच्या कबराही येथें पुष्कळ आहेत. प्राचीनकाळीं या स्थळाची विद्वत्तेविषयीं फार कीर्ति होती त्याप्रमाणेंच ती मुसलमानी आमदानींतही कायम होती असेंही या नांवावरून दिसून येतें. तसेंच येथें एक चांगला किल्ला आहे त्यावरून या स्थळास किल्लेधार असेंही लोक ह्मणतात.

ही धारा नगरी बरीच प्राचीन आहे असें दिसतें. प्रसिद्ध ग्रीक भूगोलवेत्ता टालेमी यानें ( इ. स. १५० ) उज्जयनीपासून नैऋत्येस एका अंशावर §Zerogerei झेरोगिरी नांवाची एक नगरी असल्याचें लिहिलें आहे ती बहुधा धारानगरीच असावी असें प्राच्य पंडीत लॅसेनचें दृढ अनुमान आहे.

---

§ टीपः-माजघर ( मध्यगृह, मधघर ) वांझ ( वंध्या ) वगैरे शब्दांत ध अथवा 'ध्य' च्या स्थानीं 'झ' येतो यावरून धारानगरी अथवा 'धारागिरी' या नांवाचा अपभ्रंश "झेरोगिरी" होणें संभवनीय आहे.

‡जौनपूर येथील ईश्वरवर्मन् याचा एक खंडित शिलालेख इ. स. ५०० ते ६०० चे दरम्यानचा आहे. त्यांत धारेचा उल्लेख आला आहे. तसेंच इसवी सनाच्या सातव्या शतकाचे आरंभीं सुमारें १५ वर्षें ( इ. स. ६२९–४५ ) चिनी प्रवासी ह्युएनसंग हा भरत खंडांत राहिला होता त्यानें आपले प्रवास वृत्तांत अवन्ती व माळवा ( मोलप्पो ) याचें पृथक वर्णन दिलें आहे त्यावेळीं माळव्याची राजधानी धार असावी असें प्राचीन संशोधकांचें अनुमान आहे. यानंतर इसवीसनाच्या नवव्या शतकाचे आरंभापासून ही नगरी परमारांचेच सत्तेखालीं होती यावरून या नगरीचें प्राचीनत्व चांगलें लक्षांत येईल.

इ. सनाचे नवव्या शतकाचे आरंभीं माळव्यांत सुविख्यात परमार वंशातील राजपुरुषांनीं आपली सत्ता प्रस्थापित केली तेव्हांपासून दिवसें-दिवस या घराण्याचा लौकिक व प्रताप अधिकाधिक वाढत गेला. या परमार वंशांतील राजांचें मुख्य राजधानीचें ठिकाण उज्जयिनी असून कुल राजधानी धारा होती. परंतु नंतर कांहीं काळानें उज्जयिनीचें महत्व कमी होऊन धारेचें महत्व वाढत गेलें आणि पुढेंतर धारेसच परमारांनीं आपली राजकीय राजधानी कायम केली. परिमल अथवा पद्मगुप्त कवीच्या नवसाहसांक चरितांत या नगरीचें

निर्जित्य लंकामपि वर्ततेया ।
यस्याश्च नायात्यलकाऽपिसाम्यम् ॥
जेतुःपुरी साप्यपरास्तियस्या ।
धारेति नाम्ना कुल राजधानी ॥

---

‡ Inscription No. 51 plate No. XXXII Jaunpur stone inscription of ईश्वरवर्मन a fragment.
*Corpus Inscriptionum Indicaram.*

असें मोठें बहारीचें वर्णन केलें आहे. या वर्णनांत कवीनें लंकेशीं व अलकावतीशी धारेची तुलना केली आहे यावरून प्रथमतः वरवर पहाणारास हें वर्णन कवीच्या केवळ कल्पना सृष्टींतलें अतिशयोक्तीचें व निवळ काव्यमय आहेसें भासेल परंतु थोडया विचारानें तें वर्णन अगदींच अयथार्थ व त्या कालचे वस्तुस्थितीस सोडून नाहीं अशी खात्री होईल. लंका नगरीशीं तुलना केली आहे याचें कारण असें दिसतें कीं, ज्याप्रमाणें लंकानगरीच्या सर्व बाजूंनी समुद्र होता त्याप्रमाणेंच या धारानगरीच्या चोहोंबाजूस १२ वर तलाव होते ( यापैकीं बहुतेक अद्यापही आहेत. ) ह्मणजे अर्थात धारेभोंवतीं जलाशयांचें एक मोठें कडेंच होतें. दुसरें अलकावती ही कुबेराची नगरी हिमालयांत असल्यानें उंचवट्यावर आहे त्याप्रमाणेंच धारानगरीही विंध्यपर्वताचे पठारावर—उंचवट्यावरच—आहे. याशिवाय लंका व अलकावती या दोन्ही नगरींचा वैभवसंपन्नते संबंधानें व सौंदर्यासंबंधानें जसा लौकिक होता तसाच या धारानगरीचा लौकिक त्याकालीं फार झाला होता. तेव्हां कवीनें केलेलें वर्णन केवळ काल्पनीक नाहीं अशी खात्री होईल. यांत काव्य व थोडी अतिशयोक्ति आहे ती कवित्वास उचित अशीच आहे.

तसेंच भोजशाळेंत सांपडलेल्या परमार वंशांतील राजा अर्जुनवर्मदेव याचे वेळच्या शिलोत्कीर्ण विजयश्री अथवा पारिजातमंजरी नामक राजप्रशस्तिरूप नाटिकेचे प्रस्तावनेंत या नगरीचें

> चतुरशीति चतुष्पथ सुरसदन प्रधाने ।
> धारापुर्या * * * * शारदा देव्याःसद्मनि ।
> सकल दिगंतरो पागतानेक त्रैविद्य सहृदय.
> सकला कोविदरसिकसुकविसंकुले । इत्यादि.

असें विद्या व वैभवसंपन्नतेचें वर्णन केलें आहे. " धारा ही त्या-काळीं फार विस्तृत नगरी असून तींत ८४ चतुष्पथ अर्थात् चौपाटया, चौक व विस्तृत रस्ते होते. तसेंच या नगरींत त्याकाळीं मोठमोठीं भव्य राजमंदिरें, देवालयें, विद्यालयें व नाटयशालाही होत्या. शिवाय या नगरीचे भोंवती असलेल्या टेकडयांवरून सुंदर बगीचे होते " असेंही वर्णन त्यांत आहे. राजवल्लभकृत भोजचरित्रांतही धारेच्या संपत्तीचें विस्तृत वर्णन आहे.

असो. अशा या वैभवशाली नगरीवर इसवीसनाचे तेरावे शतकाचे अखेरीपर्यंत ह्मणजे सुमारें ५०० वर्षे परमार राजांची सत्ता प्रचलित होती पुढें इ. सनाच्या सतराव्या शतकाचे अखेरीपर्यंत या स्थळावर मुसलमानांचा अम्मल होता.

मुसलमानांचे वेळीं प्रथमतः धार हें कांहीं दिवस सुभायतीचें मुख्य ठिकाण होतें परंतु पुढें माळव्यांत स्वतंत्र सुलतानांची सत्ता स्थापन झाल्यावर पुनः थोडे दिवस या नगरीस राजधानीचें वैभव प्राप्त झालें होतें; परंतु पुढें लौकरच माळव्यांतील सुलतानांनीं आपलें तख्त मांडव येथें नेल्यामुळें, धारेचें महत्व थोडें कमी झालें. अकबराचेवेळीं धार हें मांडव सरकारपैकीं महालचें मुख्य ठिकाण समजलें जात असे.

पुढें इसवीसनाचे अठरावे शतकाचे आरंभीं माळवा प्रांत मराठ्याचे सत्तेखालीं आला त्यावेळीं सुदैवानें परमार-पवार या कुळांत उदाजीरावा-सारख्या प्रतापशाली पुरुषांचा उदय होऊन पुनः या नगरीचें स्वामित्व परमार-पवार (महाराष्ट्रीय) या घराण्याकडेस आलें. हा एक विलक्षण दैवयोगच ह्मटला पाहिजे. या योगायोगामुळेंच ऐतिहासिक दृष्टया या स्थलास व या परमार कुलास निराळेंच महत्व आलें आहे.

परमारांचा व या धारानगरीचा हा संबंध फार प्राचीन काळापासून केवळ अंग व छाया या न्यायानें चालत आला आहे कारण मुख्यतः परमारामुळेंच या नगरीचा उदय होऊन या नगरीचे साहचर्यानेंच परमारांचें वैभव उत्तरोत्तर वाढत गेलें आणि यामुळेंच परमार कुलांतील राजपुरुषांचें, नव्हे तर सामान्य जनांचे देखील, मनांत या नगरीविषयीं सर्वत्र साभिमान प्रेम वसत आलें आहे. या परमार कुलांतील मुंजभोजप्रभृति महाप्रतापशाली राजांनीं आपले आंगच्या अतुल पराक्रम, अपार बुद्धिवैभव, अद्वितीय औदार्य, अप्रतीम प्रजावात्सल्य व अमर्याद विद्याप्रियता इत्यादि गुणांनीं आपल्या पूर्वजांनीं संपादन केलेल्या या नगरीची कीर्ती व वैभव अत्यंत वाढविलें. याचे मुळाशींही या नगरीविषयींचें त्यांचें उत्कट व साभिमान प्रेमच असलें पाहिजे. परमारांचा व धारानगरीचा हा अन्योन्य संबंध एके हिंदी कवीनें

**जहां पुवार तहां धार ।**
**और धार तहां पुवार ॥**
**धार विना पुवार नहीं ।**
**और नहीं पुवार विना धार ॥**

या मार्मिक कवितेंत दर्शविला आहे. तो मोठा गमतीचा आहे.

असो अशा या सुप्रसिद्ध नगरीच्या व परमार कुळाच्या इतिहासाची जी माहिती आजपर्यंत उपलब्ध झाली ती थोडक्यांत द्यावयाची आहे.

या नगरीच्या इतिहासाचे वर दर्शविल्याप्रमाणें साधारणतः परमारांचा (इ. स. ८०० ते १३१०) पर्यंत, मुसलमानी आमदानीचा (इ. स. १३१०–१७२५) पर्यंत, व हल्लींच्या पवार घराण्याचा इ. स. १७२५ पासून आजपर्यंत) असे तीन भाग पडतात. तेव्हां आतां याप्रमाणेंच या तीनही राजकर्त्यांचे इतिहासाची माहिती पुढें भागशः दिली आहे.

---

टीपः—अवसराचे आभावामुळें हल्लीच्या पवार घराण्याचा इतिहास या पुस्तकांत देतां आला नाहीं याबद्दल खुलासा प्रस्तावनेंत झालाच आहे.

# धार संस्थानचा संक्षिप्त प्राचीन इतिहास.

## भाग १ ला.

### माळव्यांतील–धार–येथील
### परमार राजवंश.

प्राचीन काळापासून क्षत्रियांचे सूर्यवंश, चंद्रवंश, अग्निवंश वगैरे नांवानें जे वंश प्रसिद्ध आहेत त्यांपैकीं परमार हे अग्निवंशांतीलआहेत. या अग्निवंशाविषयीं प्रबंधकारांनीं असें वर्णन केलें आहे कीं, मागच्या राज्यक्रांत्या व धर्मक्रांत्या यामुळें सनातन धर्माचें रक्षण करणाऱ्या क्षत्रियांचा ऱ्हास झाला, असें पाहून वसिष्ठ ऋषींनीं अर्बुदाचलीं ह्मणजे अबू पर्वतावर याग करून अग्निकुंडांतून चार शस्त्रधारी वीर निर्माण केले, त्यांचे वंशास अग्निवंश असें नांव आहे; त्यांपैकीं पहिला वीर परमार यानें शत्रूंचा संहार करून आपली गादी तेथेंच अचलगडी व चन्द्रावती नगरींत स्थापिली व तेथून पुढें परमारांनीं क्रमाक्रमानें माळव्यांत येऊन तेथील राज्य हस्तगत करून घेऊन उज्जयिनी व धार येथें इसवी सनाचे नवव्या शतकाचे आरंभीं आपलें वास्तव्य कायम केलें$ या परमारांचे राज्याचा माळव्यांतील मूळ संस्थापक

१ उपेन्द्र राज

हा होता यास कृष्णराज असेंही ह्मणत. हा मोठा पराक्रमी व धर्मनिष्ठ राजा होता. उपेन्द्र राजा नंतर

---

$एके वेळीं सर्व पृथ्वी ह्मणजे भरतभूमी परमारांची असून त्यांनीं ती इतर रजपुतांस वांटून दिली असें ‘ भाटांचे ’ ग्रंथांत वर्णन आढळतें. “ पृथ्वी पुवारातणी । आणी पृथ्वीतण्यापुवार ॥ एक आबूगढ बेसणो ॥ दुजी उज्जेनी धार ” ॥ १ ॥ या दोह्यांत भाटांची आख्यायिका ग्रथित आहे.

## वैरिसिंह ( १ ला )

व

## सीयक ( १ ला )

हे दोन पुरुष इ. स. ८७५ पर्यंत अनुक्रमें राज्यावर होते. यानंतर या वंशांतील ४ था पुरुष सीयक ( १ ला ) याचा पुत्र

## वाक्पतिराज ( १ ला )

इ. स. ८७५-९१४

हा राज्यारूढ झाला. याचें मूळ नांव अजयराज होतें. यानें उत्तरेस गंगा नदीपर्यंत व दुसरे बाजूस समुद्र किनाऱ्यापर्यंत स्वाऱ्या करून विजय मिळविले असें त्याचें वर्णन उदैपूर प्रशस्तींत आहे. याचे बापाचे कारकिर्दींत हा एकदां दशपूर ( हल्लींचें मंदसोर ) या गांवीं छावणीचा तळ देऊन राहिला होता त्यावेळीं तेथील लोक कांहीं कारणानें बंडास उद्युक्त झाले होते; परंतु त्यानें मोठ्या धैर्यानें बंडास प्रवृत्त झालेल्या लोकांचे पुढाऱ्यांस बोलावून आपल्या मनोहर व उत्साहवर्धक भाषणांनीं अनुकूल करून घेऊन देशांत शांतता प्रस्थापित केली. या वेळेपासूनच त्यास वाक्पतिराज असें अन्वर्थक नांव मिळालें. यानें सुमारें ३९ वर्षें राज्य करून आपल्या आयुष्याचे अखेरचे दिवस आपली राणी कमलादेवी इच्यासह वानप्रस्थाश्रमांत राहून कुरुक्षेत्रांत तपश्चर्या करण्यांत घालविले. यानंतर या वंशांतील पांचवा पुरुष

## वैरिसिंह ( २ रा )

इ. स. ९१४-९४१

सिंहासनारूढ झाला. धारा नगरीचे इतिहासांत याचें नांव विशेष ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. यानेंच प्रथमतः आपल्या तरवारीचे जोरावर धारा नगरीचें स्वामित्व संपादन केलें व येथें आपली राजधानी कायम केली. वैरिसिंहाचे पराक्रमामुळेंच

या नगरीला 'धारा'¶ अर्थात् खड्गधारा असें सार्थ नामाभिधान मिळालें. आणि ह्मणूनच या नगरीविषयीं परमार वंशीय राजांस विशेष अभिमान वाटतो. या राजानें गयेस बौद्ध भिक्षूंचे बंडाचा मोड करण्यास गौड देशचे राजास चांगलें सहाय्य केलें असें वर्णन भाटांनीं केलें आहे. यानें २७ वर्षें राज्य करून आपल्या वयाच्या ७१ व्या वर्षीं देह ठेविला. याचे नंतर त्याचा पुत्र

## सीयक (२ रा) [साहावा राजा]

इ. स. ९४१-९७३

हा सिंहासनारूढ झाला. यास हर्षदेव असही नांव होतें. याचे वेळेपासूनच परमार वंशीय राजाविषयींची विस्तृत व इतिहास दृष्ट्या खात्रीलायक माहिती प्राचीन संस्कृत वाङ्मयांतून मिळते. यानें कित्येक राजांवर स्वाऱ्या करून विजय मिळविले. दक्षिणेंतील मान्यखेट (हल्लीचें कलबुर्ग्याजवळील मालखेड) येथील राष्ट्रकूट-वंशीय राजा खोट्टिगदेव याचा यानें सर्वस्वी पराभव केला. (इ. स. ९७१-७२) व त्यास आपला अंकित बनविलें. या स्वारींत हर्षदेवास अपार संपत्ति मिळाली. हूण राजांवरही यानें जय मिळविला असें वर्णन आहे. हे हूण बहुधा मुसलमानच असावेत. पद्मगुप्त कवीनें आपल्या नवसाहसांक चरित्रांत या राजाचे भोगी व विरागी असें दोन्ही प्रकारांनीं वर्णन केलें आहे. यानें आपले हयातींतच राज्याचा भार आपला पुत्र मुंजराज याचे कडेस सोंपवून मोक्षप्राप्तीसाठीं अरण्यवास पत्करिला. हर्षदेवानंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र

---

¶शत्रोर्वर्ग धारया सन्निहत्य
श्रीमद्धारा सूचिता येन राज्ञा ॥

—उदेपूर प्रशस्ती—

## वाक्पति राज ( मुंजदेव ) [ सातवा राजा ]

हा राज्यावर बसला. याची §"मुंजराज" या नांवानें लोकांत विशेष प्रसिद्धी आहे. याचे नांवास अनेक गौरवाचीं बिरुदें लावीत. उदेपूर प्रशस्तींत याच्या पराक्रमाचें फारच गौरवपूर्ण वर्णन आलें आहे. यानें कर्नाटक, गुजराथ, केरळ वगैरे देशचे राजांवर स्वाऱ्या करून सर्वत्र आपला दरारा बसविला; व कित्येकांस आपले मांडलिक करून आपलें राज्य बरेंच वाढविलें.

इ.स. ९७३-९९७

दक्षिणेंतील कल्याणपूरचा चालुक्यवंशीय राजा तैलपदेव (२ रा) हा मुंजराजाचा समकालीन होता. याचेवर मुंजराजानें १६ वेळा स्वाऱ्या केल्या. शेवटचे स्वारींत उभयतांचें वर्धा नदीवर मोठें निकराचें युद्ध झालें. (इ. स. ९७९) त्यांत तैलपदेवाचा पराभव होऊन तो कैद केला गेला. मुंजराजानें त्यास आपली राजधानी उज्ययिनी येथें आणून पुढें सोडून दिलें.

मुंजराजानें तैलपास सोडून दिलें हें मुंजराजाच्या उदार वृत्तीस शोभे-सेंच झालें. परंतु मुंजराजाकडून नेहमी पराभव व शेवटीं कैद झाल्याचा अपमान तैलपास सहन झाला नाहीं. त्यानें पुनः मुंजराजावर सूड उगवि-

§" मुंज " या नांवासंबंधानें प्रबंधातून एक आख्यायिका प्रसिद्ध आहे ती अशी:—वाक्पति राजाचा पिता हर्षदेव हा एकदां वनांत शिकारीस गेला असतां तेथें त्यास मुंज नांवाच्या गवताचे-मोळाचे-झुवक्यांत एक सुंदर बालक आहे, असें आढळून आलें. हें बालक नुकतेंच जन्मलेलें असून त्याचें नालच्छेदनही झालेलें नव्हतें. बालक चांगलें सौंदर्यसंपन्न व तेजस्वी असल्यानें त्यास पाहून हर्षदेवाचे मनांत साहजि-कच प्रेमाचें भरतें आलें. लागलीच त्यानें त्या अर्भकास उचलून घेऊन राजवाड्यांत घेऊन येण्याविषयीं आपल्या सेवकांस आज्ञा केली. यावेळीं हर्षदेवास संतती नव्हती व अनायासें या सुंदर व तेजस्वी पुत्राचा लाभ झाला असल्यानें यासच दत्तक घेण्याचा त्यानें विचार ठरविला व क्षात्रियांचे चालीप्रमाणें नालच्छेदनादि सर्व संस्कार करून त्यास यथाविधी दत्तक घेतलें आणि मुंज गवतांत सांपडल्यावरून त्याचें मुंज असें नांव अन्वर्थक ठेविलें.

ण्याचे इराद्यानें लढाई देण्याची जय्यत तयारी चालविली व इ. स. ९९५ चे सुमारास मोठ्या कडेकोट तयारीनिशीं माळव्यावर चाल करून आला. या वेळीं मुंजदेवाचा मंत्री रुद्रादित्य यानें तैलप देवास गोदावरी पार केल्यावर पुढें त्याचे राज्यांत चाल करीत न जाण्याविषयीं शपथपूर्वक आपले मालकास सांगितलें होतें; परंतु या मंत्र्याचे सांगण्याकडे मुंजराजानें लक्ष दिलें नाहीं. तैलपावर १६ वेळां विजय मिळविला असल्यानें मुंजराजास फार गर्व झाला होता; आणि यामुळें यावेळींही आपण यशच घेऊन येऊं अशा फुशारकींत तो तैलपाशीं लढत लढत त्याचे राज्यांत गेला. तेथें आल्यावर तैलपानें त्यास युक्तीनें घाप्यांत घेतलें व कैद करून आपले राजधानीस घेऊन गेला. तेथें आरंभीं मुंजराजास चांगल्या रीतीनें वागविण्यांत येत होतें. मुंजराजाची योजना प्रथम त्यानें आपली बहिण **मृणालवती** हिला शिक्षण देण्याकडे करून, त्याची सर्व व्यवस्था तिच्याकडेसच सोपविली होती. कांहीं दिवसांनीं मृणालवती व मुंजराज हीं दोघें प्रेमरज्जूंनीं बद्ध झालीं. अशा स्थितींत मुंजराजाचा मंत्री रुद्रादित्य यानें मुंजराजाचे सुटकेविषयीं जे गुप्त प्रयत्न चालविले होते तेही मुंजराजास कळले होते. तेव्हां याकामीं मृणालवतीचीही मदत व अनुमोदन मिळावें म्हणून मुंजराजानें तिचें मन वळविण्याचा प्रयत्न चालविला. मुंज राजानें येथून जावें हें तिला बरें वाटलें नाहीं. आणि मुंजराजाचा हा बेत सिद्धीस न जावा म्हणून तिनें ही बातमी आपले भावास (तैलपास) कळविली. तैलपास या गोष्टीचा फारच राग आला. त्यानें लागलीच मुंजराजास अधिक बंदोबस्तांत ठेविलें; व त्रास देण्यास सुरवात केली. व अखेरीस मुंजराजाचा फार छळ करून आपली बहिण मृणालवती इचे इच्छेविरुद्ध त्याचा शिरच्छेद करविला !

मुंजराजासारख्या महापराक्रमी राजाचा अशा अत्यंत शोचनीय रीतीनें †अंत व्हावा हा केवळ दैव दुर्विलासच होय. !!!

† जैन प्रबंधकार मेरुतुंगाचार्य याच्या प्रबंध चिंतामणींत हें मनोहर कथानक रंगविलें आहे. आणि कै॰ वा॰ पंडित वामन शास्त्री इसलामपूरकर यांनीं त्याला मराठी कादंबरीचा पोषाख चढविला आहे.

मुंजराज हा जसा अत्यंत शूर व युद्धकला निपुण होता तसाच तो मोठा संस्कृत पंडित, कवि व ग्रंथकारही होता. शिवाय तो चांगला गुणज्ञ व रसिक असल्यानें त्यानें आपल्या आश्रयास कित्येक मोठमोठे संस्कृत पंडित व कवि ठेविले होते. यामुळेंच या राजास त्या विद्वन्मंडळांत " कविमित्र " अथवा 'कविबांधव' असें मोठें गौरव सूचक व यथार्थ नाम मिळालें होतें.

पद्मगुप्त कवीनें आपल्या नवसाहसांकचरित या काव्यांत मुंज राजाच्या विद्वत्तेची फारच तारीफ लिहिली असून, मुंजराजाकडून विद्वान लोकांस जो उदार आश्रय मिळत होता त्याचें फार मनोरम रीतीनें वर्णन केलें आहे. या राजाचा दरबार ह्मणजे सर्व भरतखंडांतील विद्वान व पंडितांची एक सभाच होती. असें ह्मटलें तरी शोभण्यासारखें आहे. याचे आश्रयाखालीं कित्येक मोठमोठे कवि व ग्रंथकार निपजले असून त्यांचे आज उपलब्ध असलेले ग्रंथ मुंजराजाच्या विद्वत्तेची व गुणग्राहकतेची साक्ष भरीत आहेत. फार काय सांगावें, हा विद्वत्प्रिय व सरस्वतीभक्त राजा 'सरस्वती कल्पलतेचा कंठ' असून आधारही समजला जात होता. आणि ह्मणूनच त्याचे मागें कवींचे 'गते मुञ्जे यशः पुञ्जे निरालंबा सरस्वति' असे सहज उद्गार निघाले.

या विद्यानुरागी व दानशूर राजाचे पदरीं असलेल्या कवि व पंडित यापैकीं कांहीं विद्वज्जनांचा परिचय येथें वाचकांस करून देणें इष्ट आहे.

१ पद्मगुप्त अथवा परिमलः—हा एक उत्तम कवि असून मुंजराजाचे दरबारांत यांस राजकवि ह्मणून विशेष मान होता. " नव-सांहसांक चरित " हें एक याचें काव्य हल्लीं उपलब्ध आहे. या काव्यांत मुंजराजानंतर राज्यपदारूढ झालेला त्याचा धाकटा भाऊ राजा 'सिंधुराज' याचे संबंधाच्या एका प्रसंगाचें काव्यमय वर्णन आहे. याची कविता चांगली

सरळ असून मनोरम आहे. आणि त्यांत विक्रम कालीन कालिदासाच्या भाषासरणीचें अनुकरण करण्याचा प्रयत्न कवीनें केला आहे. स्थलसंकोचास्तव रचनासाम्याचीं उदाहरणें देतां येत नाहींत.

२ पंडित धनपालः––हा मूळचा काश्यप गोत्रीय ब्राह्मण असून मोठा विद्वान होता. हा विशाला ह्मणजे उज्जयिनी येथें राहत असे. हा मुंजराजाचा कुलपुरोहित होता असें ह्मणतात. हा पुढें धारा नगरींत येऊन राहिला. यानें केलेला एक पाली भाषेचा कोश पाइयलच्छि किंवा देशीनाममाला या नांवानें प्रसिद्ध आहे. याची बहीण अवन्तिसुंदरी ही चांगली विदुषी होती. इची प्राकृत कविता अलंकारशास्त्राचे ग्रंथांतून किंवा कोषाचे टीकेंतून उद्धृत केलेली आढळते. याचें एक तिलकमंजरी नांवाचें काव्यही प्रसिद्ध आहे. हें गद्य काव्य बाणभट्टाचे कादंबरीचे धर्तीवर रचिलेलें आहे. हा पूर्वी जैन धर्माचा तिरस्कार करीत असे. परंतु पुढें यानें भोजदेवाचे कारकीर्दींत जैन धर्म स्वीकारला असें ह्मणतात. 'ऋषभपंचाशिका' ह्मणून एक जैन ग्रंथ आहे तो यानेंच केलेला आहे. त्याचा तिलकमंजरी ग्रंथ नष्ट झाल्यामुळें तो अत्यंत कष्टी झाला, परंतु आपली आवडती विदुषी कन्या इला तो समग्रग्रंथ मुखोद्गत होता; हें पाहून त्यास फार आनंद झाला.

धनपालाचा कनिष्ट बंधु शोभन हाही एक मुंजराजाचे दरबारांत चांगला प्रसिद्ध पंडित होता. यानें धनपालाचे पूर्वींच जैन धर्माची दीक्षा घेतली होती. जैन वाङ्मयांत याचे ग्रंथ विद्वन्मान्य आहेत.

३ धनंजय व धनिकः–हे बंधुद्वय मुंजराजाचे कारकिर्दीपासून विशेष प्रसिद्धीस आले.

धनंजय या कवींविषयीं कांहीं आख्यायिका प्रसिद्ध आहेत. याचा 'दशरूप' नांवाचा नाट्य शास्त्रावर एक सर्वमान्य ग्रंथ आहे. या ग्रंथावर

त्याचा बंधु धनिक 'यानें दशरूपावलोक' नांवाची टीका लिहिली असून 'काव्यनिर्णय' नांवाचा एक अलंकार शास्त्रावर ग्रंथ लिहिला आहे. धनिकाचा पुत्र वसंताचार्य हाही चांगला विद्वान होता. यास मुंजराजानें एक गांव दान दिला असल्याबद्दल एके ताम्रपटांत उल्लेख आहे. हा ताम्रपट वि. सं. १०३१ (इ. स. ९७४) चा आहे.

४ भट्ट हलायुधः–हा एक मोठा पंडित मुंजराजाचे पदरीं होता. मुंजराजानें त्यास आपले राज्यांत न्यायाधीशाचें कामावर नेमिलें होतें. त्याचा 'राजव्यवहारतत्व' नांवाचा दिवाणी फौजदारी कायद्यासंबंधाचा एक ग्रंथ असून पिंगलच्छंदः सूत्रांवर त्याची वृत्ती 'हलायुध वृत्ती' या नांवाची प्रसिद्ध आहे. या नांवाचे आणखीही कांहीं पंडित होऊन गेले आहेत.

अमित गतिः—हा एक जैन पंडित मुंजराजाचे वेळीं होता. याचा 'सुभाषितरत्न संदोह' नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

मुंजराजाचे आश्रित मानण्यास ज्यांविषयीं सबळ आधार मिळाला त्या पंडितांची थोडक्यांत माहिती वर दिली आहे. पण त्या शिवायही या विद्याप्रिय, रसिक व उदार राजाजवळ पुष्कळ विद्वान लोक असतील पण त्यांविषयीं विशेष माहिती मिळत नाहीं ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे !

मुंजराजानें मोठमोठ्या विद्वानास आश्रय देऊन आपले राज्यांत विद्येस उत्तेजन देण्याचे कामीं जसे प्रशंसनीय यत्न केले तसेंच राज्यांत कलाकौशल्याची वाढ होण्यासाठीं त्यानें ठिकठिकाणीं मोठमोठ्या सुंदर इमारती व देवालयें वगैरे बांधवून कुशल कारागिरांस योग्य प्रोत्साहन मिळण्याची तजवीज केली होती. या शिवाय त्यानें तलाव, विहिरी, घाट, धर्मशाळा इत्यादि धार्मिक व लोकहिताचे कृत्यांतही द्रव्याचा सद्व्यय बराच केला होता.

मुंजराजाचे हयातींत उज्जयिनी ही तर मुख्य राजधानी होतीच. परंतु धारानगरी ही चांगली निसर्गसुंदर असल्यामुळें त्यानें येथें आपलें निवासस्थान केलें होतें. व तिला मोठमोठया सुंदर मंदिरांनीं व भव्य प्रासादादिकांनीं विभूषित करून वैभवाचे शिखरास नेऊन पोंचविलें होतें परंतु दुर्दैवानें त्या वेळच्या अशा इमारतींचें नांवनिशाण देखील या ठिकाणीं पहावयास मिळत नाहीं. राज्यक्रांति व काळाचा फेरा या मुळेंच या स्थळाची अशी दुर्दशा झाली असली पाहिजे!

हल्लीं धार येथें जे १०।१२ तलाव पाहण्यांत येतात त्यापैकीं बरेचसे मुंज-राजाचे वेळींच तयार करविले गेले असावेतसें वाटतें. या तलावापैकीं सर्वांत विस्तीर्ण व रमणीय असा तलाव तर मुंजदेवाचे नांवानेंच प्रसिद्ध आहे. यास ‘ मुंजसागर ’ असें ह्मणतात. यास पूर्वीं चांगले सुंदर घाट बांधलेले असावेत. असा हा विस्तीर्ण व सुंदर तलाव मुंजराजाच्या या प्रियनगरींत त्याचें एक चिरस्थायी स्मारकच होऊन बसला आहे. याशिवाय मांडवगड येथेंही मुंजराजानें एक तलाव बांधवून त्यास आपलें नांव दिलें होतें. परंतु पुढें झालेल्या मुसलमानी अमदानींत त्याचें अगदीं रूपांतर होऊन गेलें. तथापि हल्लीं तो तलावही अवशेषरूपानें अस्तित्वांत असून ‘मुंजतलाव’ या नांवानेंच लोकांत प्रसिद्ध आहे.

तसेंच मुंजराजानें नर्मदेच्या कांठीं कांहीं ठिकाणीं व उज्जयिनी येथें कांहीं ठिकाणीं देवालयें, घाट, धर्मशाळा वगैरे इमारती बांधविल्या होत्या. महेश्वर येथें घाट व मंदिर, श्रीओंकारेश्वरी घाट व मंदिर, धरमपुरी येथील कुब्जा संगमावरील घाट, उज्जयनी येथें ‘पिशाचमोचन’ नांवाचें तीर्थ आहे तेथें क्षिप्रानदीवर एक घाट व देवालय अशीं कित्येक स्थळें मुंजराजानें बांधविलीं असल्याचें समजतें. यावरून पाहतां लोकप्रिय मुंजराजानें आपले राज्यांत पुष्कळ लोकहिताचीं कामें करून चांगलेंच नांव मिळविलें होतें.

या शिवाय त्याचे राज्याबाहेरही त्यानें अशीं कांहीं उपयुक्त कामें केलीं असतील परंतु त्याबद्दल अद्याप फारशी माहिती उपलब्ध झाली नाहीं.

हल्लीं राधनपूर स्टेटमध्यें एक 'मुंजपूर' नांवाचा गांव आहे. त्याचा या मुंजराजाशीं संबंध असणें असंभवनीय नाहीं.

मुंजराजाची दानशूरतेविषयींही बरीच ख्याती आहे. तथापि हल्लीं त्याचीं २।३ च काय तीं दानपत्रें उपलब्ध झालीं आहेत.

येथवर दिलेल्या हकीगतीवरून मुंजराजाच्या राजकीय व सार्वजनिक कर्तव्यांची बरीच कल्पना होण्यासारखी आहे.

या महापराक्रमी व लोकप्रिय राजानें सुमारें २५ वर्षेंच काय तो राज्योपभोग घेतला.

मुंजराज मरणसमयीं निपुत्रिक होता यामुळें त्याचे मागें राज्याचा अधिकार इ. स. ९९७ चे सुमारास त्याचा कनिष्ट बंधु सिंधुराज याजकडेस आला.

## सिंधुराज (सिंधुल) [ आठवा राजा ]

इ. स. ९९७-१०१०

हाही मोठा शौर्यसंपन्न राजा होऊन गेला. याचेवेळींही परमारांचे राज्याची चांगली भरभराट राहिली. व राज्याचा विस्तारही अधिक झाला. आसपासच्या राजांशीं त्याच्या नेहमीं लढाया होत. व हूणा (मुसलमानां) शींही याच्या लढाया झाल्याचें वर्णन प्राचीन ग्रंथांतून व लेखांतून आलें आहे. हा हूण राजा महमूद गझनवीच असावा असें ह्मणण्यास जागा आहे. याचे कारकिर्दींत परमारांचें राज्य दक्षिणेंत केरळ, कोंकण वगैरे प्रांतापर्यंत पसरलें असून उत्तरेकडीलही बराच मुलूख त्यानें आपले सत्तेखालीं आणिला होता. व पश्चिमेस गुजराथेंतही कांहीं मुलुखावर त्यानें आपलें वर्चस्व स्थापिलें होतें.

सिंधु राजानेंही आपला बंधु मुंजराज या प्रमाणेंच विद्वान लोकांचा परामर्ष घेण्याचें काम चालविलें होतें. मुंजराजाचे फार प्रीतिंतला व त्यावेळीं राजकवी ह्मणून प्रसिद्ध असलेला कवि 'परिमल' अथवा 'पद्मगुप्त' यास मुंजराजाचे मरणानंतर सिंधुराजाकडून पूर्वीप्रमाणें राजाश्रय चालू राहील किंवा नाहीं याबद्दल बरीच शंका होती. कारण मुंजराज व सिंधुराज या उभयतां बंधूंचा कांहीं कारणानें बेबनाव झाल्यानें मुंजराजानें सिंधुराजास कैदेंत ठेविलें होतें. आणि यामुळें अर्थातच मुंजराजाविषयीं सिंधुराजाचें मन कलुषित झालेलें असल्यामुळें मुंजराजाचे मर्जीतल्या या कवीवर सिंधुराजाची गैरमर्जी होणें अगदीं स्वाभाविक होतें, परंतु सिंधुराज हाही मनाचा उदार, विद्वान व गुणी जनांचा चाहता व रसिक असल्यानें त्यानें आपले वेळींही पद्मगुप्तादिकवी व विद्वानांचा राजाश्रय तसाच कायम ठेविला.

सिंधुराज हा मोठा बलशाली असून यानें मोठमोठीं शौर्याचीं व साहसाचीं कामें करून राज्याचा विस्तार केला व तें वैभवास चढविलें. यामुळें त्यास $'नवसाहसांक' हें एक नांव मिळालें होतें. पद्मगुप्त कवीनें 'नवसाहसांकचरित' नांवाचें एक काव्य लिहिलेलें प्रसिद्ध आहे, तें या सिंधुराजा संबंधाचेंच असून त्यांत त्याविषयींच्या एका विशेष प्रसंगाचें काव्यमय वर्णन आहे.

सिंधुराजाचें कुंज असेंही एक लोक प्रसिद्ध नांव आहे.

धारेस मुंजसागरा शेजारींच एक कुंजसागर नांवाचा तलाव आहे (त्यांत हल्लीं नेहमीं पाणी राहात नाहीं) तो अद्यापही सिंधुराजाचे कर्तव्याची स्मृति लोकांस देत आहे असेंच म्हटलें पाहिजे.

$:–'नवसाहसांक चरित' हें एक महाकाव्य असून त्यांत १८ सर्ग आहेत. यांत वेगळाल्या १९ वृत्तांत १५०० वर श्लोक आहेत. यांतील कथानक थोडक्यांत असें आहे:—सिंधुराजा एके दिवशीं शिकारीस गेला असतां एक हरीण त्यानें पाहिलें त्याचे गळ्यांत सोन्याचा पट्टा होता. राजानें त्यास तीर मारिला. तो हरीण जखमी झाला खरा परंतु पळून गेला. राजा पुढें चालला असतां आकाशांतून उडत जात

## भोजदेव [ नववा राजा ]

पुण्यश्लोक नृपावळींत नलसा जो वीरचूडामणी ।
दानीं कर्ण जसा किरीटिसम जो शत्रूस वाटे रणीं ॥
काव्यीं वाल्मिकसा पतंजलितसा शास्त्रत्रया भीतरीं ।
वाणी-बुद्धि-शरीर-संस्करणि तो श्री भोज धारापुरीं ॥

इ. स. १०१०-१०५५.

सिंधुराजानंतर त्याचा पुत्र भोजदेव सिंहासनारूढ झाला. हा या परमार वंशांतील अत्यंत विख्यात राजा होय. भरतखंडांत विक्रमादित्याचे बरोबरीनें जर कोणाची कीर्ति गाइली जात असेल तर ती याचीच. भरतखंडाचे कोनाकोपऱ्यांतून याचें नांव

---

असलेल्या हंसाचे तोंडांतून राजाचे पायापाशीं एक रत्नमाला पडली. त्या मालेंतील रत्नावर 'राजकन्या शशिप्रभा' असें नांव खोदलेलें होतें. इकडे राजकन्या शशिप्रभा ही नर्मदा तटाकीं बसली असतांना तिचा आवडता हरीण तिचे जवळ आला. तिनें त्याचे शरीरांतील तीर उपटून काढिला. त्या तीरावर नवसाहसांक राजाचें नांव होतें तें तिच्या दृष्टीस पडलें. रत्नमालेवरील नांव पाहून सिंधुराजाचें शशिप्रभेवर जसें प्रेम जडलें त्याप्रमाणेंच बाणावरील नांव पाहून शशिप्रभेचें नवसाहसांक राजावर प्रेम बसलें. राजा जेव्हां नर्मदा तीरावर गेला तेव्हां त्याची व शशिप्रभेची गांठ पडली. त्याचे बरोबर त्याचा प्रधान रमांगद हा होता. तीं सर्व नदीतिरीं बसलीं असतां एकदम मोठें तुफान झालें. त्या वादळाच्या योगानें शशिप्रभा व तिच्या दासी या भोगावती नांवाचे नागनगरीस उडून गेल्या. इकडे एक आकाशवाणी झाली कीं रत्नावती नगरांत राहणाऱ्या वज्रांकुश नांवाच्या राक्षसास जो वीर मारील त्याला शशिप्रभेचा पिता फणिपूरचा राजा शंखपाल शशिप्रभा देईल. राजानें शशिखंड नांवाचें विद्याधराचे मदतीनें हें कृत्य केलें. त्यानंतर शशिप्रभेचें व सिंधुराजाचें लग्न झालें. शंखपालानें एक स्फाटिक शिवलिंग सिंधु राजास देणगी ह्मणून दिलें, तें सिंधु राजानें मिरवत आणून धार येथें त्याची स्थापना केली; हल्लीं धार येथें असलेलें नीलकंठेश्वराचें लिंग हेंच तें असावेंसें वाटतें.

तत्स्फाटिकं स्वमिवशुद्धमिदं गृहाण ।
त्वष्टृप्रयत्नघटितं शिवलिंगमेकम् ॥
आकारमर्धवनितावपुषः पुरारेः ।
यस्यान्तरे सुकृतिनो हि विलोकयन्ति ॥

असें त्या शिवलिंगाचें वर्णन नवसाहसांकचरित्रांत दिलें आहे. तें शोधक प्रेक्षकांनीं नीलकंठेश्वराचे लिंगाशीं मिळवून पहावें.

सर्व विश्रुत झालेलें आहे. या येवढ्या एका गोष्टीवरून ही याच्या लोकप्रियतेची, बुद्धिमत्तेची व वैभवाची बरीच कल्पना होण्यासारखी आहे.

प्रबंधकार असें सांगतात कीं, भोजदेवाचा जन्म झाला तेव्हां त्याचा पिता सिंधुराज हा मुंजराजाचे कैदेंत होता. मुंजराज व सिंधुराज या उभयतां बंधूंचा बेबनाव असल्याचा उल्लेख वर थोडक्यांत आलाच आहे. उभयता बंधूचा असा बेबनाव होता तथापि मुंजराज हा स्वतः निपुत्रिक असल्यानें पुतण्या भोज याच्या जन्मामुळें त्यास फार आनंद झाला. व त्यानें भोजाचा जन्मोत्सव मोठ्या थाटानें साजरा केला. परमार वंशाचे वृद्धीस कारण झालेल्या बाल भोजाविषयीं मुंजराजाचे मनांत चांगले प्रेमांकुर उत्पन्न झाले होते. परंतु पुढें ते अंकुर एका गोष्टीमुळें खुडून टाकल्यासारखे झाले.

भोजाचे जन्मकाळीं जातक वर्तवून पुष्कळ ज्योतिषांनीं त्यासंबंधानें भविष्यें केलीं होतीं. त्यांत एका ज्योतिषानें "हा तुझे नाशास कारण होईल." असें मुंजराजास सांगितलें होतें. तेव्हां मुंजराजाचे मनांत अर्थातच भोजदेवाविषयीं द्वेषभावाचें बीज रुजलें व त्यामुळें त्यानें बाल भोजास आपले पासून दूर करण्याचा हुकूम दिला. परंतु पुन्हां वररुचिनांवाचे ज्योनिषानें मुंजराजास सांगितलें कीं

पचाशत्पंचवर्षाणि सप्तमासंदिनत्रयम् ।
भोजराजेनभोक्तव्यःसगौडोदक्षिणापथः ॥

हा मोठा विख्यात राजा होईल व गौड व दक्षिणापथ इत्यादि देशांवर राज्य करून परमार कुलाचें यश अत्यंत वाढवील. तेव्हां साहजीकच अशा भाग्यशाली मुलास दूर ठेवणें मुंजराजास बरें वाटलें नाहीं. त्यानें

आपला पूर्वीचा हुकूम रद्द केला व पुतण्यावर पूर्ववत प्रेम करूं लागला. मुंजराज हा स्वतः चांगला विद्वान असल्यानें त्यानें भोजाचे शिक्षणासंबंधानें फार काळजी घेतली. भोज हा मूळचा बुद्धिमान, त्यांत मुंजराजाचें शिक्षण व उदाहरण यांमुळें त्याचें बुद्धिसामर्थ्य लहाणपणींच चमकूं लागलें. व या उभयतां काकापुतण्यांत प्रेम व आदरबुद्धि हीं चांगल्या रीतीनें वाढूं लागलीं. इतक्यांत कांहीं कारणामुळें मुंजराजाचे मनांत पुनः पूर्वींचे द्वेषाचा प्रादुर्भाव झाला व त्याचे भरांत त्यानें भोजास जंगलांत नेऊन मारून टाकण्याविषयीं हुकुम केला. हुकुमाप्रमाणें त्यास मारेकऱ्यांनीं जंगलांत नेल्यावर प्रथमतः त्यानें मारेकऱ्यांची विनवणी केली कीं माझा शेवटचा निरोप मुंजराजाकडेस अवश्य पोचवा, व राजाचे मर्जीप्रमाणें मला खुशाल मारा; मी तयार आहें. असें सांगून

*मांधाता समहीपतिः कृतयुगालंकारभूतोगतः
सेतुर्येनमहोदधौविरचितः क्वासौ दशास्यान्तकः
अन्ये चापि युधिष्ठिरप्रभृतयो याता दिवंभूपते ।
नैकेनाऽपि समंगता वसुमति नूनं त्वया यास्यति ॥

ही कविता आपल्या करांगुलीचे रक्तानें पिंपळाचे पानावर लिहून दिली. बालभोज हा रूपगुण सौजन्यांनीं सर्व आबाल वृद्धांस अत्यन्त प्रिय झाला होता. दुष्ट पाषाण हृदयी मारेकऱ्यांस देखील त्यास पाहून द्रव आला. आणि त्या वर शस्त्र चालविण्याचा त्यांचा निश्चय ढळला. त्यानीं एक मतानें त्यास

*या श्लोकाचें मराठी रूपांतर येणें प्रमाणें:-
मांधाता नृप भूषवी कृतयुगा गेलाचकीं तोपरी ।
जो सेतू करि सागरीं अजिकुठे तो रावणाचा अरी ॥
गेले आणखिथोरभूप नृपते ! स्वर्गास धर्मादिही ।
नाहीं गेलि कुणासवें महि तुझ्या संगेंचि जाणार ही ॥

गुप्त ठिकाणीं लपवून कारागिराकडून एक मुखवटा तयार करून त्यास रक्त भंबाळ करून, पाटींत ठेऊन शुभ्र वस्त्रानें झांकून तो राजास नेऊन दाखविला. भोजानें मरतेसमयीं कांहीं निरोप सांगितला काय? असा प्रश्न झाल्यावर भोजानें करांगुलीच्या रक्तानें लिहिलेला वरील श्लोक त्यांनीं दाखविला. तो वाचून मुंजदेवास कृतकर्माचा फार पश्चाताप झाला. त्यास फार दुःख झालें. कांहीं सुचेना. तेव्हां तो मारेकऱ्यास खोद खोदून विचारूं लागला. खात्रीचें अभय वचन मिळाल्यावर त्यांनीं भोज देवास आपले अनुतप्त चुलत्यास भेटविलें. तेव्हां त्यानें भोजास आलिंगन देऊन अश्रुजलानें पापाचें क्षालन करून त्याची क्षमा मागितली व त्यावर पूर्वीं पेक्षां अधिकच प्रेम करूं लागला.

भोजदेवाचें राज्यारोहण झाल्यावर लवकरच त्यानें उज्जयिनी ऐवजीं धारानगरी ही आपली राजधानी केली. व यामुळेंच त्यास 'धारेश्वर' नामाभिधान मिळालें भोज राजाची कारकिर्द केवळ धारानगराचे इतिहासांतच नव्हे, तर सर्व भरतखंडाचे इतिहासांत महत्वाची समजली पाहिजे. या कालांत महंमद गझनवीच्या इ. स. १०१३ ते १०३० पर्यंत ६ स्वाऱ्या हिंदुस्थानवर होऊन त्यानें मथुरा, कालींजर, सोमनाथ वगैरे ठिकाणें हस्तगत केलीं होतीं. या स्वाऱ्यांत कित्येक रजपूत राजांचे या मुसलमानांशीं सामने झाले. त्यात भोज देवास किंवा त्याचे सैन्यास लढण्याचे प्रसंग आले असले पाहिजेत असें तुरुष्कांशी त्याच्या लढाया झाल्याचें जें वर्णन प्राचीन संस्कृत ग्रंथातून आहे, त्यावरून दिसून येतें. याशिवाय भोजदेव हा आपले राज्याचे शेजारचे प्रदेशांतील राजांशी-दक्षिणेंतील कल्याणपूरच चालुक्य, त्रिपुरी ( हल्लीचें जलपुराजवळील तेऊर ) येथील हयहय ऊर्फ चे-

दि किंवा कलचुरी राजे, गुजराथेंतील अनहिलवाडपट्टन (हल्लीचें कडीपाटण) येथील चौलुक्य राजा भीमदेव इत्यादि राजांशीं लढण्यांत गुंतलेला असे.

या वेळच्या बलाढ्य रजपूत राजांनीं अन्तःकलह सोडून एक जूट केला असता तर महमूद गझनवीस तंबी मिळून भरतखंडाचा इतिहास कांहीं निराळाच झाला असता.

दाक्षिणेंतील चालुक्य वंशीय राजांशी परमार वंशांतील राजांचे नेहमीच खटके उडत असत. मुंजराजाचे वेळीं तर चालुक्यांचा कित्येक वेळां पराभव झाला; परंतु अखेरीस एके लढाईंत दुर्दैवानें मुंजराज चालुक्य राजा तैलप देव याचे हातीं सांपडून त्याचा वध केला गेला. तेव्हां-पासून तर हा वैराग्नि विशेषच भडकत गेला होता. मुंजराजाचे वधाचा योग्य मोबदला चालुक्यांस मिळाला पाहिजे, अशी परमारांची प्रबल इच्छा; परंतु ती सिंधुराजाचे वेळीं पूर्ण होणें राहिली होती. ही गोष्ट भोज देवाचे मनांत एकसारखी जाचत होती; आणि ह्मणून त्यानें सैन्याची चांगली तयारी करून, चालुक्यांवर चाल केली यावेळीं कल्याणपूरचे चालुक्यांचे गादीवर विक्रमादित्य (५ वा) हा होता. या स्वारींत त्याचा पूर्ण पराभव झाला व तो कैद होऊन शेवटीं मारला गेला. अशारीतीनें मुंजराजाचे वधाचा सूड उगविल्यावरही कांहीं दिवस परमारांचे व चालुक्यांचे झगडे चाललेच होते. विक्रमादित्यानंतर चालुक्याचे गादीवर यावेळीं जयसिंह व सोमेश्वर ऊर्फ आहवमल्ल हे दोन राजे झाले. या दोघांच्या व भोजदेवाच्या लढाया होऊन त्यांत उभयपक्षांस कधीं जय तर कधीं अपजय मिळत. परंतु पुढें सोमेश्वर ऊर्फ आहव मल्ल यांचे वेळीं लवकरच या दोन्ही कुलांत सख्य नांदू लागलें.

त्रिपुरी येथील कलचुरी अथवा चेदि वंशांचे राजांशींही वरील प्रमाणेंच परमाराचें फार दिवसांचें वैर होतें. या वेळीं त्रिपुरी येथील गादीवर चेदिराज गांगेयदेव हा होता. यानें विक्रमादित्य हें वैभवद्योतक नांव धारण केलें होतें. हा मोठा बलाढ्य व महत्वाकांक्षी असल्यानें वेळोवेळीं भोजदेवास व दुसरे आसपासचे राजांस त्रास देत असे. अखेरीस भोजदेव व गांगेयदेव या उभयतांत मोठी निकराची लढाई होऊन तींत भोजदेवानें गांगेयदेवाचा अगदीं मोड केला. पुढें तो फार नम्र होऊन भोजदेवास शरण आला. पुढें कांहीं दिवस या दोन्हीं राज्यांत चांगला सलोखा नांदत होता. गांगेयदेवानंतर त्रिपुरी येथील राज्यावर कर्णदेव आला. हा आपला पिता गांगेयदेव यापेक्षां पराक्रमांत व कीर्तींत अधिक मोठा निपजला. याचें व भोजदेवाचें आरंभीं बरेंच सख्य राहिलें. एकदां तर कर्णदेवास भोजदेवानें एक सोन्याची पालखीही देणगीदाखल दिली होती. परंतु उभय राजांतील हें सख्य फार दिवस टिकलें नाहीं.

गुजराथेंतील अनहिलवाटपट्टण येथील चौलुक्यवंशीय राजेही परमारांचे पिढीजात शत्रु किंवा मित्र असत. चौलुक्याचे गादीवर यावेळीं भीमदेव १ ला हा राज्य करीत होता. भीमदेव एकदां सिंधदेशचे राजावर स्वारीस गेला असतां त्याचे मागें भोजदेवानें आपला जैन मंत्री कुलचंद्र याजकडून भीमदेवाचे राज-

१ चेदीदेशास डाहल म्हटलेले संस्कृत ग्रंथांत व आल्बेरूनीच्या फारशीग्रथांत आढळतें. त्रिपुरीच्या चेदीराजांचे अनेक ताम्रपत्र उपलब्ध झाले आहेत. नुक्ताच एक रेव संस्थानांत सांपडलेला ( इ. स. १०३८ चा ) पंडित हीरालाल यांनीं प्रसिद्ध केला आहे.

२ या महत्वाचे विजयाप्रीत्यर्थ भोजदेवानें एक लोहमय विजयस्तंभ धार येथें उभारला त्याची माहिती पुढें योग्य स्थळीं येईल.

३ धारेस हल्लीं कनसागर नांवाचा एक तलाव आहे. त्याचा कर्णदेवाच्या नांवाशीं कांहीं संबंध असावासें वाटतें.

४ मित्रत्व असतांना उभयतांत जे प्रेमदर्शक व्यापार होत त्यांच्या गोष्टी प्रबंधकारांनीं अनेक वर्णिल्या आहेत. भोजसभा विद्वत्तेविषयीं प्रसिद्ध असल्यामुळें भीमदेवानें आपल्या पदरचा चतुर पंडित डामर ( दामोदर ) यास धारेस आपल्याकडील प्रतिनिधी ( वकील ) म्हणून धाडिलें होतें.

धानीवर स्वारी करविली होती. या स्वारींत कुलचंद्रानें चालुक्य राजधानी पाटण इजवर छापा घालून लुटली आणि राजवाड्याचे महाद्वाराजवळ शंख पुरले. कुलचंद्राचे हल्ल्यावरून कुलचंद्राचा दंगा म्हणून गुजराथेंत एक म्हण प्रचलित झालेली आहे. कुलचंद्रानें अनहिलवाडचे अधिकाऱ्यांपासून जयपत्र लिहून घेतलें. विजयी कुलचंद्र परत आल्यावर भोजदेवानें त्याचा मोठा सत्कार केला. परंतु शंखांच्या ऐवजीं मीठ कां पेरलें नाहीं, म्हणून त्यास दोष लाविला. तो म्हणाला शंख हे लक्ष्मीबंधू होत, ते पेरल्यानें मालवलक्ष्मी कधींतरी गुजराथेंत जाईल, याचें सूचक चिन्ह झाल्यामुळें हा अपशकुन झाला ही गोष्ट केव्हां झाली हें ठरवितां येत नाहीं. आणि गुजराथीप्रबंधांत याचा उल्लेखही आढळत नाहीं. याचें कारण आपले धन्याचा अपमानकारक गोष्टी वगळण्याचा सांप्रदायच पडून गेला होता. यामुळें भीमदेवाचे मनांत भोजराजाविषयीं अधिक शत्रुत्व वागूं लागलें. त्यानें चेदिराज कर्णदेवाशीं सख्य करून उभयतांनीं भोजदेवावर चाल करून जाण्याचें ठरविलें.* या कटांत कर्णाटक राजाही होता व त्याप्रमाणें इ. स. १०५५ चे सुमारास त्या त्रिवर्गांनीं मोठ्या तयारीनें तिन्ही बाजूनें धारेवर चाल केली. या स्वारींत भोजदेवाचा पराभव झाला व या नंतर पुढें लवकरच भोजदेव मरण पावला ! यामुळें सर्व साम्राज्य रिपुतिमिरपटलानें आच्छादित होऊन दुःखसागरांत पडलें.

क्षत्रियांस अवश्य असलेले शौर्यादि गुण भोजदेवाचे अंगीं पूर्णपणें वसत असल्यानें त्यानें भरतखंडांत बऱ्याच मोठ्या प्रदेशावर आपलें स्वामित्व

---

१ भीमदेवाच्या घोडेस्वारांनीं धारा नगरी जिंकली असा उल्लेख कुमारपाल प्रशस्तींत आहे. आणि कीर्तिकौमुदी नांवाच्या ग्रंथांत वर्णन आहे, कीं भीमदेवानें भोजदेवास पराभूत करून धरलें पण त्याची विद्वत्ता व सद्गुण मनांत आणून त्यास जिवें न मारतां सोडून दिलें. या पराभवामुळें झालेल्या अपमानाचा बदला घेण्याकरितां कुलचंद्राकडून भोजानें गुजराथेवर स्वारी करविली असावी.

—कुमारपालाची वडनगर प्रशस्ति व सोमेश्वराची कीर्तिकौमुदी—

* येनो ( उदयादित्येन ) द्धृत्यमहार्णवोपममिलत् कर्णाटकर्णप्रभुम् ।
उर्वीपालकदर्पितां भुवमिमां श्रीमद्वराहायितम् ॥

याचा भावार्थ—कर्नाट देशचा राजा व कर्णदेव यांनीं आपसांत जूट करून आपल्या सैन्य सागरांत धारेस बुडविलें. तेव्हां उदयादित्यानें वराह अवतारीचें चरित्र करून धाराराज्याचा उद्धार केला. ( नरवर्म प्रशस्ति ( नागपूर ) प्राचीन लेखमाला भाग २ पृष्ठ २०७ )

स्थापिलें होतें. या वेळीं ‘ बुंदेलखंड व बाघेलखंड ’ शिवाय करून नर्मदा नदीचे उत्तरेकडील पुष्कळसा मुलूख व दक्षिणेकडील गोदावरी नदीपर्यंतचा सर्व प्रदेश भोजदेवाचे अमलाखालीं होता. भोजदेवाचे मृत्युनंतर परमाराकडेस इतकी विस्तृत व पूर्ण सत्ता कधींच आली नाहीं.

भोजदेवानें आपल्या पराक्रमानें तर चांगलीच कीर्ति मिळविली परंतु त्यानें आपल्या दानशूरतेनें व विद्वत्तेनें ती अगदीं अजरामर करून ठेविली आहे.

जुन्या संस्कृत ग्रंथांत भोजदेवास ‘ त्रिविधवीरचूडामणि ’ असें महत्वसूचक विशेषण दिलेलें आहे; म्हणजे तो रणवीर, विद्यावीर व दानवीर यांचा शिरोमणि होता. पुष्कळशा संस्कृत पंडितांस व कवींस आश्रय दिल्याबद्दल मुंज राजाचा फार लौकिक आहे+ परंतु भोजदेवानें तर मुंजदेवावरही कडी केली आहे. यांत कांहीं शंका नाहीं. भोजदेवाचे सभेंत १४०० पंडित होते, अशी आख्यायिका आहे, पुष्कळशा कवींनी व ग्रंथकारांनीं आपापले ग्रंथांतून भोजदेवाचे विद्वत्ता, औदार्य व गुणज्ञता या गुणांबद्दल फार प्रशंसा केली आहे. भोजदेवाचा समकालीन जो महमूद गझनवी याच्या पदरचा आरबी महापंडित अलबेरुनी, यानें आपल्या ग्रंथांत भोजदेवाची तारीफ लिहिली आहे. याचे वेळीं विद्वानांस व कवींस ज्या मोठमोठ्या देणग्या मिळत त्याबद्दल प्रबंधकारांनीं लिहून ठेवलेल्या गोष्टी तर पुष्कळच आहेत. एका कवीनें—

‘ यद्विद्वद्भवनेषु भोजनृपतेस्तत्त्यागलीलायितम् * ॥ ”

अर्थात् ‘ भोजदेवाचे आश्रित विद्वानांचे येथें जें कांहीं ऐश्वर्य दिसतें ती सर्व भोजदेवाची दानलीला आहे ’ असे जे उद्गार काढले आहेत ते खरोखरच फार संस्मरणीय आहेत; त्यावरून भोजदेवाचे असाधारण दातृत्वाची चांगलीच कल्पना होते.

---

+ पुत्रस्तस्य ( श्रीहर्षदेवस्य ) विभूषिताखिलधराभोजो गुणैकास्पदं ।
**शौर्याक्रांत**समस्तशत्रुविभवोऽधिन्याग्यवित्तोदयः ।
वक्तृत्वोच्चकवित्वतर्ककलनप्रज्ञातशास्त्रागमः । **श्रीमद्वाक्**पतिराजदेव इतियः सद्भिः सदा कीर्त्यते ॥ कर्णाटलाटकेरलचोल शिरोरत्नरागिपदकमलः । **यश्चप्रणयिगणार्थितदाताकल्पद्रुमप्रख्यः**

--उदेपूर प्रशस्ति--

प्राचीन लेखमाला पृष्ट १९८

* हा उल्लेख मम्मटाच्या काव्यप्रकाशांत आढळतो.

भोजदेवाचे विद्वत्तेचा लौकिक फारच आहे व त्याची प्रचीति हल्लीं जे त्याचे ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांवरून येण्यासारखी आहे. वाङ्मयाच्या एकाद्या विवक्षित शाखेवरच त्याचे ग्रंथ आहेत असें नाहीं. काव्याशिवाय अनेक शास्त्रांवर त्यानें रचिलेले अनेक ग्रंथ आज विद्यमान आहेत. पंतजलीचे योगसूत्रावर त्याची भोजवृत्ती नांवाची विद्वन्मान्य टीका प्रसिद्ध आहे त्या टीकेचे प्रस्तावनेंत एके श्लोकांत भोजराजाचें भगवान् पतञ्जलीशीं साम्य वर्णिलें आहे तें फार गमतीचें आहे. पतञ्जली मुनींनी वाणीचें संस्कारार्थ व्याकरण महाभाष्य रचिलें, बुद्धिचे संस्कारार्थ योगसूत्रें रचिलीं आणि शरीराचे संस्कारार्थ वैद्यशास्त्रावर ग्रंथ लिहिले त्याप्रमाणेंच भोजदेवानेंही या तीनही शास्त्रांवर ग्रंथ रचून भगवान् पतंजली मुनीशीं आपली साम्यता दर्शविली आहे.

भोजदेवाचें अनेक शास्त्रनैपुण्य ध्यानांत येण्यासाठीं त्यानें केलेल्या ग्रंथांची यादी येथें देणें अवश्य आहे.

१ ज्योतिष शास्त्र–राजमृगांक करण, ( संवत् ९६४ इ. स. १०४३ ) राज मार्तंड, विद्वज्जन–वल्लभ–प्रश्नज्ञान, आणि आदित्य-प्रताप-सिद्धांत.

२ अलंकार शास्त्र–सरस्वती कंठाभरण[1].

३ योगशास्त्र–‘ राजमार्तंड ’ नांवाची पतंजलिप्रणितयोग सूत्रावरील विद्वन्मान्य टीका[2].

४ धर्मशास्त्र–पूर्तमार्तंड, दण्डनीति, व्यवहारसमुच्चय आणि चारुचर्या.

५ शिल्पशास्त्र–समरांगण सुत्रधार व युक्तिकल्पतरु×

६ काव्यें–चम्पूरामायण कांडें * ५ महाकाली विजय, विद्याविनोद, शृंगार-मंजरी इत्यादि. याशिवाय प्राकृतभाषेंत त्यानें पुष्कळ काव्यरचना केली

१ मम्मटाचा काव्य प्रकाश आणि जगन्नाथ रायाचा रसगंगाधर हे ग्रंथ प्रचारांत आल्यापासून सरस्वती कंठाभरण हा ग्रंथ मागें पडला.

२ ही अद्यापि पंडित मान्य आहे.

× यांत वास्तुशिल्पाशिवाय जहाजें बांधण्याच्या प्रकारचेंही वर्णन आहे. हा ग्रंथ भोज विरचित असावा असें विद्वद्वर्य राजेंद्रलाल मित्र यांचे मत आहे–राधाकुमुद मुकर्जी यांचा ग्रंथ Indian Ship building–

* शेवटचे सहावें कांड मात्र लक्ष्मण सूरिनें रचून ग्रंथ पूर्ण केला. सहाव्या कांडाच्या आरंभीं लक्ष्मण सूरीनें आपल्याकडे कमीपणा घेऊन भोजदेवाचा गौरव केला आहे.

असावी. त्यापैकीं कांहीं काव्यें ( स्तोत्रें ) नुकतींच १५।१६ वर्षांपूर्वीं धार येथील भोजशाळेंत शिलेवर कोरलेलीं सांपडलीं आहेत. त्यांपैकीं एक दोन पूर्ण असून बाकींचीं खंडित आहेत.

७ व्याकरण—याविषयांत त्याचे संस्कृत व प्राकृत ग्रंथ होते.

८ वैद्यशास्त्र—विश्रांत–विद्या–विनोद आणि आयुर्वेदसर्वस्व.

९ संस्कृत कोश–नाममाला.

१० याशिवाय शालिहोत्र, शद्बानु शासन, सिद्धांतसंग्रह सुभाषित प्रबंध, इत्यादि ग्रंथही त्याचे नांवानेंच प्रसिद्ध आहेत.

जर्मन पंडित आऊफ्रेक्ट ( Aufrecht ) यानें आपल्या संस्कृत ग्रंथाचे सूचींत ( Catalogus catologorum ) भोजदेवकृत २३ ग्रंथांचीं नांवें दिलीं आहेत. कित्येक भारतीय संस्कृत पंडित व शास्त्रकारांनीं आपापल्या ग्रंथांतून भोजदेवाच्या त्या त्या शास्त्रांतील पारंगतते बद्दल आदरपूर्वक उल्लेख केले आहेत. * कवित्वासंबंधानें तर कित्येक ग्रंथकारांनीं त्याचा ‘कविराज’ अर्थात् कविश्रेष्ठ असा उल्लेख केला आहे. विद्वानांत हेंही प्रसिद्ध आहे कीं, हनुमान् नाटक हें पहिल्यानें शिलावर खोदलेलें असून समुद्रांत फेकून दिलें गेलें होतें त्याचा उद्धार भोजदेवानें केला.+

भोजदेवाचेवेळीं नेहमीं लढाया वगैरेचे प्रसंग येत असल्यानें देशांत स्वस्थता नव्हती तथापि अशा कालांतही विद्यावृद्धीचे–विद्याप्रसाराचे–कामीं त्यानें जे प्रयत्न चालविले होते ते खरोखरच अत्यंत प्रशंसनीय म्हटले पाहिजेत आणि या त्याच्या प्रयत्नामुळें त्या काळीं संस्कृत विद्येस विशेष उत्तेजन मिळालें. त्यानें आपले राज्यांत ठिकठिकाणीं विद्यालयें व पाठशाला स्थापन करून आपल्या प्रजेच्या शिक्षणाची व्यवस्था केली होती. अशा विद्यालयावर योग्य शिक्षक नेमिले असून त्यांत हजारों विद्यार्थ्यांस विद्यादान मिळत असे. अशाप्रकारचें एक विद्यालय धारानगरींत असून दुसरें मंडपदुर्ग ( हल्लींचें मांडव ) येथें होतें. मांडव येथील विद्यालयावर भट्ट गोविंद नांवाचे पंडिताची योजना केली गेली होती. हल्लीं धार येथें

* त्यांचीं नांवें धार ग्याझेटियर पृष्ठ १४८ यांत सांपडतील.

+ सदरील यादी आजपर्यंत उपलब्ध झालेल्या माहितीवरून तयार करण्यांत आली आहे. ती अगदीं शुद्ध असेल अशी हमी भरतां येत नाहीं. पुढील शोधामुळें कांहीं ग्रंथ कदाचित् काढून टाकावे लागतील, किंवा कदाचित् तींत भरही पडेल,

कमालमौला नांवाची एक इमारत आहे. त्या ठिकाणींच वर लिहिलेलें धार येथील विद्यालय असावें. कारण या इमारतीस हल्लींही लोक "भोजशाला" किंवा "भोजकी निसाल" असेंच म्हणतात. ( या स्थलाचें विशेष वर्णन पुढें योग्य स्थलीं येईल ).

विक्रमसभेप्रमाणें भोजदेवाचा दरबार शेंकडों विद्वान्, पंडित व कविरत्नांनीं मंडित होता. त्यांत नवसाहसांक चरित्रकार परिमल अथवा पद्मगुप्त तिलकमञ्जरीकार धनपाल, भट्ट गोविंद व विद्यापति भास्करभट्ट. इत्यादि प्रमुख होते भास्कर भट्ट हा प्रसिद्ध ज्योतिषी भास्कराचार्य याचा पूर्वज होय. यास भोजदेवानें विद्यापति ही बहुमानाची पदवी दिली होती. *

भोजसभेंत कालीदास नांवाचा एक प्रख्यात कवि असून त्यावर भोजदेवाची फार कृपा होती अशी सर्वत्र समजूत आहे. या कवीचें चातुर्य, समयसूचकता, शीघ्रकवित्व व शहाणपण याविषयीं कित्येक गोष्टी लोकांत प्रसिद्ध आहेत. फारतर काय, त्या भरतखंडाच्या खेड्यापाड्यांतून देखील सर्वत्रांच्या तोंडीं त्या झाल्या आहेत. यावरून कालिदास नांवाचा कोणी मोठा बुद्धिवैभवसंपन्न कवि भोजदेवाचे सभेंत होता हें खास परंतु तो कोण व त्याचे ग्रंथ कोणते याचा अद्याप निश्चय झालेला नाहीं. याबद्दल विद्वानांचे शोध चालू आहेत. 'नवसाहसांक' काव्याच्या भाषासरणीवरून व वर्णन शैलीवरून त्याचा कर्ता पद्मगुप्त यासच कालीदास ही सन्माननीय पदवी कदाचित् भोजराजानें दिली असेलसें वाटतें. याचप्रमाणें आनंदपूर ( हल्लींचे काठियावाडांतील वडनगर ) येथील रहिवासी उवट नांवाचा एक गुर्जर पण्डित होता तो उज्जयिनीस भोजदेवाचे आश्रयानें राहत असे. त्यानें शुक्ल यजुर्वेदावर भाष्य लिहिलेलें प्रसिद्ध आहे. यावरून विक्रमसभेप्रमाणेंच भोजसभाही पुष्कळशा विद्वद्रत्नांनी भूषित होती हें मात्र निर्विवाद आहे.

भोजदेवास पाश्चात्य पंडित 'भारतीय ऑगस्टस' म्हणतात यांत बिलकुल अतिशयोक्ति नाहीं. भोजनामांकित सर्वच ग्रंथ कदाचित् स्वकृत नसतील, परंतु स्वकृत असणें अगदीं असंभवनीय आहे असेंही म्हणतां येत नाहीं. कारण "दुष्करं किंमहात्मनाम्" !

---

* त्यावेळीं प्रत्येक राजसभेंत ह्या पदावर एका सर्वमान्य पंडिताची योजना होत असे. उदाहरणार्थ विक्रमांक देवचरिताचा प्रणेता प्रसिद्ध काश्मिरी पंडित बिल्हण हा दक्षिणेंतील चालुक्यांचे पदरीं कल्याणपूर येथें विद्यापतिपदारूढ होता.

याचे वेळीं मोठमोठ्या शिलापट्टावर ग्रंथचे ग्रंथ कोरून ठेवण्याची चाल अधिक प्रचारांत आली. यामुळें शिला कोरणारे कारागिरही उत्तम उत्तम निपजूं लागले, व आश्रयार्थ बाहेरून येऊं लागले. कित्येक घराण्यांतल्या कलेची वंशपरंपरेनें वाढ होत गेली. कित्येक शिलालेखकांचीं नांवें धार येथील शिलालेखांत आढळतात. ताम्रपत्रें कोरण्याचाही धंदाही असाच वाढला. भोजदेवाचा आवडता शिलालेखक गोविंद नांवाचा हूण कुलोद्भव रजपूत होता[1].

परंतु दुर्दैवानें हे टिकाऊ शैलग्रंथही पढें कालाचे कठोर दाढेंत सांपडून विकलित व चूर्णित झाले. त्यापैकीं कांहीं शिलापट्ट व त्यांचीं शकलें दैववशात् कोठें कोठें सांपडतात तीं त्यावेळची साक्ष देतात.

यावेळीं बौद्धांचा ऱ्हास झाला होता परंतु जैनांचें बरेंच प्राबल्य होतें. या अवैदिक पंडितांसही भोजसभेंत चांगला मान मिळत असे यावरून भोजदेवाचें अंतःकरण किती उदार, निराग्रही व गुणग्राहक होतें हें चांगलें लक्षांत येईल.

---

१ त्याचा नातू भास्कर याजकडून अजमेर येथील प्रसिद्ध चौहान राजा विग्रहराज यानें स्वकृत हरकेली नामक नाटक शीलेवर कोरविलें. त्याचे शेवटीं ही माहिती दिली आहे. ती मनोरंजक असल्यामुळें खालीं दिली आहे.

> अस्मिन्निर्मलहूणपार्थिवकुले गोविंदनामासुधी–
> स्तैस्तैः कोविदवंद्यसद्गुणगणैर्यो भोजराजप्रियः ।
> तज्जन्मा सुकृतिर्महीपतिरभूत् तस्यात्मजो भास्करः
> सः श्रीविग्रहराजनिर्मितमिदं प्राज्ञोऽलिखन् नाटकम् ॥

२ धार येथें शहाचंगाल नांवाची एक मस्जीद ( मुकरबा ) आहे तिचे पुढील दरवाजावर एक लेख आहे त्यांत भोजदेवानें मुसलमानी धर्माचा स्वीकार करून 'अबदुल्ला ' हें नांव धारण केलें होतें असें लिहिलें आहे, परंतु या गोष्टीस वरील लेखा शिवाय फारसी तवारिखांत किंवा अन्यत्र विश्वसनीय आधार नसल्यानें व यावेळीं मुसलमानांचा इतका अम्मल हिंदुस्थानांत, विशेषतः माळव्यावर, मुळींच नसल्यानें ही गोष्ट मुळींच संभवनीय दिसत नाहीं. कदाचित् भोजदेव हा स्वभावतः विद्यानुरागी असल्यानें जैन पंडितांस तो जसा आदरानें वागवीत होता तसा कोणी मुसलमान अवलिया त्यावेळीं येथें आला असल्यास त्याचाही त्यानें आदर केला असेल व येवढ्या एका गोष्टीवरून कदाचित् कोणीं स्वधर्म गौरव बुद्धीनें असें लिहून ठेविलें असेलसें दिसतें शिवाय हा लेख भोजराजानंतर ४०० वर्षांनीं लिहिलेला आहे तेव्हां तो विश्वसनीय मानणें युक्त वाटत नाहीं. माळव्यांत मुलसमानांचा अम्मल पुढें भोजदेव दुसरा (इ. स.१२८०–१३२०) [पुढें चा.]

परमार कुलमणि भोजदेवाचे राज्यांत विद्येस विशेष उत्तेजन मिळून विद्या-वृद्धीचे कामीं जसे प्रशंसनीय प्रयत्न झाले तसेच राज्यांत कलाकौशल्य व उद्योग यांची वृद्धी होऊन प्रजेच्या सुखसोई वाढविण्याकडेसही त्यानें चांगलें लक्ष्य पुरविलें होतें. प्राचीन संस्कृत वाङ्मयांतून धारानगरीच्या सौंदर्याचें जें प्रशंसापर वर्णन आढळतें त्यावरून भोजदेवाचे वेळीं ही नगरी बरीच विस्तीर्ण व मोठमोठ्या भव्य, सुंदर व उत्तुंग प्रासादादिकांनीं मंडित होती. नगरांत पुष्कळसे विस्तृत चतुष्पय अर्थात् चौपाटी रस्ते व चौक असून मोठमोठ्या बाजार पेठाही वसलेल्या होत्या. शहराच्या आसपास पर्वतवलयाप्रमाणें एक मोठ्या धूळ कोटाचें कडें असून त्याच्या बाहेर सदोदित जलपूर्ण मोठा खंदक होता. त्यांतच कोठें कोठें मोठीं सरोवरें होतीं. अशा तटबंदीवरून या नगरीस सदोदित परचक्राचें भय होतें असें दिसून येतें. शिवाय भोजदेव हा मोठा उदार व धर्मात्मा असल्यानें अलीकडील इतिहासांत होळकरांचे कुळांत प्रसिद्ध असलेल्या देवी अहल्येप्रमाणें त्याचे धर्मकृत्यांनीं भरतखंडाच्या चाऱ्ही दिशा व्यापल्या होत्या. ठिकठिकाणीं त्यानें घाट, विहिरी, देवालयें, धर्मशाळा वगैरे बांधून पथिकजनांची व यात्रेकरूंची सोय करून ठेविली होती. उदेपूर प्रशस्तींतील.

"केदार–रामेश्वर–सोमनाथ–सुंडीर–कालानल रुद्रसत्कैः ।
सुराश्रयैर्व्याप्यच यः समन्तात् यथार्थसंज्ञां जगतींचकार ॥"

या श्लोकावरून भोजदेवानें भरतखंडांत केदार, रामेश्वर, सोमनाथ, महाकाल इत्यादि भव्य शिवमंदिरें बांधिलीं असल्याचें समजतें. भोजदेवाचें सर्वांत मोठें व अजस्र काम म्हटलें म्हणजे भोपाळ ( भोजपाळ ) चे राज्यांतील सागर तुल्य महासरोवर हें होय. येथें एक प्रचंड बांध घालून वेत्रवतीसारख्या कित्येक नद्या अडवून भोजदेवानें हा विशाल महासागर, सुमारें २५० चौरस मैल क्षेत्राचा निर्माण केला होता. हा बांध पुढें १५ वे शतकांत मांडवचा सुलतान हुषंगशहा यानें फोडल्यामुळें पाणी वाहून जाऊन हल्लीं त्याचा सुमारें $\frac{१}{१०}$ भाग

याचेवेळीं अधिक झाला तेव्हां या लेखाचा संबंध कदाचित् त्या भोजदेवाशीं असल्यास नकळे ! शिवाय उदारधीराजपुरुष सर्व धर्मांतील पंडितांस व गुरुजनांस मान देतात, यावरून त्या त्या धर्मांकडे त्यांचा कल आहे असें त्या त्या धर्मांच्या अभिमान्यांस वाटणें साहजिक आहे, याच कारणावरून भोजदेव व अकबर यांनीं जैन धर्मदीक्षा घेतली होती असा प्रवाद प्रचलित झाला आहे. हेंही लक्षांत ठेवावें.

उरला आहे त्याबद्दलही लोकांत “ तालमें ताल भोपाल ताल और सब तलैय्या हैं ” अशी एक सरोवराचें लोकोत्तरत्व दर्शविणारी म्हण प्रसिद्ध आहे. पाणी वाहून गेल्यामुळें जो जमिनीचा भाग मोकळा झाला त्यावर पुढें एका फार सुपीक परगण्याची वसाहत झाली आहे. हाच भोपाळचे राज्यांतील ताल नांवाचा परगणा होय. हा परगणा तलावांत वसविला असल्यानें त्यास ताल हें पूर्वस्मृति सूचक नांव मिळालें आहे. यावरून हा कृत्रिम तलाव मूळचें स्वरूपांत विद्यमान असेल तेव्हां केवढा अफाट व प्रचंड असेल याची कल्पना केल्यास तो खरोखरच आफ्रिका व अमेरिका या खंडांतील एकाद्या नैसर्गिक सागराशीं स्पर्धा करणारा दिसत असेल! या सरोवराचे कांठावर भोजपूर नांवाचे गांवा-जवळ भोजदेवानें एक भव्य शिवालय बांधविण्याचा आरंभ केला होता. तें अर्धेंच बांधलेलें शिवालय आज जवळ जवळ ९०० वर्षें पूर्ण होण्याच्या आशेनें दुसऱ्या धर्मात्म्यांची वाट पाहत उभें आहे. त्या देवालयांतील स्वयंभू शिवलिंग तर इतकें मोठें आहे कीं, येवढें मोठें शिवलिंग सर्व भरतखंडांत बहुधा दुसरें सांपडावयाचें नाहीं. काश्मीर देशांतील कल्हण कवीच्या “ राजतरंगिणी ” ग्रंथावरून समजतें कीं, काश्मीरांतील कपाटेश्वराजवळील ‘ पापसूदन ’ नांवाचें तीर्थ भोजदेवानें असंख्य द्रव्य खर्चून दगडी बांधविलें. हें अद्याप विद्यमान आहे. हें पवित्र तीर्थ सुंदर वर्तुलाकार बांधविलेलें असून त्याचा व्यास सुमारें ६० यार्ड आहे त्यास सर्व बाजूनीं उतरण्यासाठीं पायऱ्या केलेल्या आहेत. या तीर्थाचें पवित्रोदक भोजराजास पिण्यासाठीं तुंगचे तुंग भरून येत असे. याशिवाय उज्जयिनी व धार या दोन्ही राजधानीच्या नगरींत त्यावेळचें वैभव दर्शविणाऱ्या असंख्य इमारती, घाट, देवालयें, धर्मशाळा, सरोवरें वगैरे असतील परंतु हल्लीं त्यावेळच्या कामाचे १।२ रूपांतरित भग्नावशेष मात्र राहिले आहेत! ते पाहून भर्तृहरीच्या “ सारम्या नगरी ” या श्लोकाचें स्मरण होतें व ज्या कालानें हें सर्व केवळ स्मृतिशेष करून ठेविलें त्या कालास नमस्कारच करावासा वाटतो!!

मालवचक्रवर्ति भोजदेवानें उज्जयिनी ऐवजीं धार हें आपल्या राजधानीचें ठिकाण केल्याचें वर लिहिलेंच आहे. याशिवाय त्यानें कित्येक नवीन नगरां-चीही वसाहत केली असली पाहिजे. हल्लीं भोपाळचे राज्यांत दीप ( द्वीप ) स्टेशनाजवळ भोजपूर नांवाचा पूर्वोल्लेखित गांव आहे तो भोजराजानेंच वस-विलेला आहे. तसेंच नर्मदानदीचे काठीं असलेले हल्लींचें हुषंगाबाद शहर हेंही त्यानेंच वसविलेलें असलें पाहिजे या शहराचें पूर्वकालीन नांव ‘ भोजकट ’

असल्याचें समजतें. यावरून या ठिकाणीं भोजदेवाची छावणी राहत असावी असें दिसतें. माळव्याचा सुलतान हुषंगशहा यानें ज्याप्रमाणें भोजदेवानें बांधविलेल्या भोपाळाजवळील तलावाचा विध्वंस करण्याचे इराद्यानें बांध फोडून टाकिला, त्याचप्रमाणें या शहराचेंही नांव बदलून त्यास हुषंगाबाद हें आपलें नांव दिलें. * यावरून माळव्यांतील या सुलतानाचे कारकीर्दीतच धार उज्जयिनी व मंडपदुर्ग ( हल्लींचे मांडव ) येथील परमानकालीन प्राचीन मंदिराचा व प्रासादांचा उच्छेद करण्यांत आला असें दृढ अनुमान होतें × हल्लीं हिंदू व जैन इमारतीच्या सामानाचा नवीन मशीदी बांधण्याकडे उपयोग झाल्याचीं बरींच उदाहरणें उज्जयनी व धार येथें आहेत त्यावरून वरील अनुमानास आणखी दुजोरा मिळतो. मंडपदुर्ग उर्फ मांडव हें भोजदेवाचेवेळीं छावणीचें ठिकाण होतें येथें एक मोठें विद्यालय भोजदेवानें बांधविलें असून तेथें हजारों विद्यार्थी शिकत असत हें पूर्वीं आलेंच आहे याशिवाय हल्लीं तेथें एक भोजकुंड आहे तेंही भोजदेवानेंच बांधविलें असल्याचें समजतें. धारशहराचे भोंवतीं असलेला जुना धुळकोटही भोजदेवाचीच कृती आहे असें म्हणतात पण तो कदाचित् त्याचे पूर्वींचे राजांचे वेळचा असावा.

या महापराक्रमी, वैभवशाली व सरस्वतीभक्त राजानें सुमारें ४५ वर्षे राज्य केलें. याचे कारकिर्दींत राज्याची सर्वांगानीं भरभराट झाली होती. विक्रमादित्याचेवेळीं माळव्यांत ज्याप्रमाणें उज्जयिनी नगरीची अत्यंत प्रसिद्धी झाली होती. त्याप्रमाणेंच या विद्वन्मान्य व गुणज्ञ राजामुळें यावेळीं धारा नगरीचा लौकिक सर्व भरतखंडभर पसरला होता. या नगरींत दूरदूरच्या देशांतले मोठे मोठे पंडित, कवि व कलाकोविद येऊन राहिले असून त्यांस या विद्यानुरागी व उदार राजाकडून चांगला आश्रय मिळत गेल्यानें ही नगरी त्यावेळीं सर्व माळवा प्रांताची वैभवसंपन्न राजधानी, संस्कृत विद्येचें माहेरघर व विद्वान् व पंडित यांचें केवळ आश्रयस्थान होऊन राहिली होती. आणि यामुळेंच या नगरीसंबंधानें त्यावेळच्या पंडितांचे

* मंडपदुर्गाचेंही नांव बदलून त्याचें मुसलमानांचेवेळीं शादियाबाद असें नांव ठेवण्यांत आलें होतें.

× उज्जनी येथें चोवीसखंबी स्थलाचा मोठा भव्य दगडी दरवाजा आहे. तो विक्रमादित्याचे प्रासादांचा अवशेष मानला जातो. परन्तु तो भोजप्रासादाचा अवशेष मानावा हें अधिक बरें दिसतें.

अद्यधारा सदाधारा सदालंबा सरस्वती ।
पण्डिता मण्डिताः सर्वे भोजराजे भुवंगते ॥

असे यथार्थ स्मृतिदर्शक प्रशंसापर उद्गार निघाले आहेत. तसेंच भोजदेवाचे मृत्युनंतर या स्थितींत कसा बदल झाला तोही कवीनें

अद्य धारा निराधारा निरालंबा सरस्वती ।
पण्डिता खंण्डिता सर्वे भोजराजे दिवंगते ॥

याप्रमाणें वरील कवितेंत योग्य व मार्मिक बदल करून दर्शविला आहे. या दोन्ही उद्गारांवरून भोजदेवाचे हयातींतल्या व नंतरच्या स्थितीचें स्पष्ट चित्र नजरेसमोर उभें राहतें. *

प्रसिद्ध इतिहासकार व्हिन्सेंट स्मिथ यानें आपल्या भरतखंडाचे प्राचीन इतिहासांत भोजदेवाविषयीं प्रशंसापर उद्गार काढिले आहेत.

तसेंच या राजाविषयीं एका प्राचीन संस्कृत कवीनें *

साधितं विहितं दत्तं ज्ञातं तद्यन्न केनचित् ।
किमन्यत्कविराजस्य श्रीभोजस्य प्रशस्यते ॥

म्हणजे जें कोणीही साधिलें नाहीं तें त्यानें साधिलें, जें कोणाचे हातूनही घडलें नाहीं. ते त्याचे हातूंन घडलें, जें दान कोणास देतां आलें नाहीं तें त्यानें दिलें व जितकें ज्ञान कोणास संपादितां आलें नाहीं तें त्यानें संपादिलें यापेक्षां या कविराज भोजदेवाची कोठवर स्तुती करावी ? असे जे यथार्थ उद्गार काढले आहेत ते खरोखरच विचारणीय आहेत. त्यावरून भोजदेव हा किती लोकोत्तर राजा होऊन गेला. याची चांगली कल्पना येईल.

हें भोजदेवाचें संक्षिप्त चरित्र संपविण्यापूर्वी त्याबद्दल प्राचीन प्रशस्त्यांत जे चटकदार उद्गार आले आहेत त्यापैकीं कांहीं जिज्ञासु रसिकांचे मनोरंजनार्थ उद्धृत करणें अप्रशस्त होणार नाहीं.

---

* त्यावेळीं मध्यवर्ती मालवदेशाचे आसपास अनेक बलाढ्य रजपूतराज्यें होतीं. त्यासर्वांवर भोजदेवाच्या चारित्र्याचा पगडा बसल्यावाचून राहिला नाहीं. त्या सर्वांस भोजदेवाच्या कीर्तीची स्पर्धा उत्पन्न होऊन त्यानींही आपआपल्या राजधानींत पंडित सभा व शारदा मंदिरें बांधून पंडित व कवि यांचा योग्य गौरव करण्यास आरंभ केला होता. तात्पर्य भोजदेवामुळें सर्वत्र विद्वान् पूजले जाऊन विद्याध्ययनास उत्तेजन मिळालें.

* उदैपूर प्रशस्ति.

आकैलासान्मलयगिरितोऽस्तोदयाद्रिद्वयादा
भुक्तापृथ्वीपृथुनरपतेःस्तुल्यरूपेण येन ॥
उन्मूल्योर्वीभरगुरुगणालीलया चापयष्टया ।
क्षिप्तादिक्षुक्षितिरपि परांप्रीतिमापादिता च ॥
चेदीश्वरेन्द्ररथतोग्गलभीममुख्यान् । कर्णाटलाटपति गुर्जरराटतुरुष्कान ॥
यद्भृत्यमात्रविजितानवलोक्यमौळादोष्णांबलानि कलयन्ति न...लो......

प्राचीन लेखमाला भाग १ पृष्ठ १९९.

या दोन श्लोकांपैकीं पहिल्या श्लोकांत भोजाच्या राज्याचा विस्तार वर्णिला आहे. खरोखरी येवढा विस्तार कदाचित नसेल, तथापि येवढ्यां सर्व प्रदेशावर त्याच्या सद्गुणाची छाप पडली होती हें मात्र खास. दुसऱ्या श्लोकांत त्यानें जिंकलेल्या राजांचा नामनिर्देश आहे. तो अक्षरशः खरा असला पाहिजे. परंतु इंद्ररथ व तोग्गल हे कोण व कोठील यांचा शोध अद्याप लागला नाहीं.

एकंदरीत भोजदेव हा आपले अंगच्या अलौकिक शौर्य, वर्णनीय औदार्य, असाधारण विद्वत्व इत्यादि गुणांनी केवळ आपल्या जीवनसमयांतच नव्हे तर ह्या वेळेपर्यंत लोकांना अत्यंत प्रिय व पूज्य वाटत असून परमारकुलास तर केवळ लालमयभूत होऊन राहिला आहे. +

भोजदेवाचे मृत्युनंतर येथील राज्याधिकार

### जयसिंह [ दहावा राजा ]

याजकडेस आला यानें धामधुमीच्या काळांत अवघें ४ वर्षें राज्य केलें. त्यामुळें वंशावळ्यांत याचें नांवदेखिल आढळत नाहीं.

इ. स. १०५५–१०५९ परंतु एका ताम्र शासनावरून त्याचें अस्तित्व सिद्ध झालें आहे. यानें धार येथे कैलासभवन नावाचा एक आश्रम बांधवून त्यांत पांथस्थ साधूंना व यतीनां राहण्याची व्यवस्था केली होती असें म्हणतात. याचेवेळीं विशेष महत्वाच्या कांहीं गोष्टी घडल्या नाहींत. कारण यावेळीं राज्यक्रांतीची गडबड माजली होती. जयसिंहदेवानंतर भोजदेवाचे बंधुवर्गापैकीं वीराग्रणी व सार्थनामधेय

---

+ सुभाषित रत्नभाण्डागार नांवाच्या सुभाषित संग्रहांत भोजदेवाच्या स्तुतीचे जितके श्लोक आहेत तितके कोणच्याही दुसऱ्या राजाचे नाहींत यावरूनही या विधानास पुष्टि मिळते.

## उदयादित्य [ अकरावा राजा ]

झाला. यानें शत्रूचा पराभव करून राज्याचा उद्धार केला. ' भोजदेवाचे मरणानंतर धारानगरीचा प्रतापसूर्य मावळून शत्रूंनीं माजविलेल्या अस्वस्थतारूप कृष्णरात्रीमुळें माळव्यांत चोहोंकडे जो गाढ अंधःकार माजला होता तो उदयादित्य याचे उदयानें पार नाहींसा होऊन ही नगरी पुनः या वैभवसूर्याच्या किरणांनी चमकूं लागली व तिचा प्रताप दिवसेंदिवस अधिक पसरत चालला. ” उदयादित्याविषयीं अशाप्रकारचे गौरवपर वर्णन त्याकाळच्या शिलालेखातून केलेलें आहे. यावरून उदयादित्याचे वेळेपासून पुनः माळव्यांत परमाराचे सत्तेचा उत्कर्ष होण्यास सुरवात झाली. एका प्रशस्तींत ह्मटलें आहे कीं ज्यानें अनायासें धरणीवरील कित्येक प्रतापी राजाचें उत्पाटन केलें त्यास या राज्यांतील कंटक उपटून टाकणें काय कठीण ? ÷

इ. स. १०५९–१०८६

उदयादित्याचे अंगींही विद्येची अभिरुची व गुणज्ञता हे आनुवंशिक गुण पूर्णपणें वसत होते + यानें आपल्या मुलांचे शिक्षणाची फार काळजी घेऊन त्यांस चांगले पंडित बनविले होते. याचा दुसरा मुलगा नरवर्मदेवतर कांहीं प्रशस्त्यांचा कर्ता असल्याबद्दल त्याची पंडितांत व कविमंडळांत प्रसिद्धी आहे.

उदयादित्यास लक्ष्मदेव, नरवर्मदेव व जगदेव असे तीन पुत्र होते. लक्ष्मदेव व नरवर्मदेव हे दोघे उदयादित्यानंतर अनुक्रमें राज्यपदधारी झाले. तिसरा मुलगा जगदेव हा मोठा शूर व योद्धा असून गुजराथचा चौलुक्यवंशीय राजा प्रसिद्ध सिद्धराज जयसिंह याचे पदरीं सेनाधिपती म्हणून राहिला होता. सिद्धराज जयसिंहाचे दरबारांत जगदेवाचें फारच वजन होतें. सिद्धराज हा त्यास

---

÷ प्रा. ले. मा. भाग १ पृ. १९९.

+ भोज शाळेंतील धातुप्रत्ययमालारूपनागबंधाचे शिरांवर दोन अनुष्टुप श्लोक आहेत त्यांत उदयादित्य आणि नरवर्म या पितापुत्रांची नावें आढळतात. त्याप्रमाणें उज्जनीयेथें श्रीमहांकाळाचे देवालयांत भोजशाळेंतील वर्णमालेची दुसरी प्रत शिलोत्कीर्ण आहे, तींत ही या दोन्ही राजांचीं नावें आलीं आहेत. हेच श्लोक खरगोणाजवळील ऊन येथील नागबंधावर कोरलेले आहेत. यावरून या राजानीं अनेक ठिकाणीं संस्कृत पाठशाळा स्थापिल्या होत्या असें दिसतें.

आपले बरोबरीनें मान देत असे येवढेंच नव्हे तर जगदेवाच्या पराक्रमावर लुब्ध होऊन त्यानें त्यास आपली कन्याही अर्पण केली होती.

जगदेव हा कालिकेचा महान् भक्त होता. यानें एके प्रसंगी आपलें शिर देवीस अर्पण केल्याबद्दल एक आख्यायिका प्रसिद्ध आहे.

ग्यारासो एकावने चैतसुदी रविवार ।
जगदेव शीस समापीयो धारा नगर पंवार ॥

अशी हिन्दी कविता वरील गोष्टीसंबंधानें भाटांचे ग्रंथांत प्रसिद्ध आहे. हल्लीं ग्वालेर संस्थानांत भेलशाजवळ उदैपूर नावाचा एक जुना गांव आहे. तेथें पुष्कळसे प्राचीन शिलालेख सांपडले आहेत. त्या लेखांवरूनच या परमार वंशांतील राजा संबंधानें बरीच विश्वसनीय माहिती मिळाली आहे. हा गांव उदयादित्यानेंच आपल्या नावानें बसविला होता. हें उदैपूर या नांवावरूनच दिसून येतें. या गांवीं उदयादित्याचे वेळचें एक भव्य शिवालय आहे. त्यावरील कोरीव काम फारच प्रेक्षणीय आहे.

त्या शिवालयांतच हे परमारकालीन शिलालेख आहेत. वास्तु शिल्प कलेचा हा सुंदर नमूना मुसलमानांचे तडाख्यांतून वाचला याचें आश्चर्य वाटतें. त्याजवळच एक मशीद आहे ती मात्र जवळील दुसऱ्या देवळांच्या मसाल्यानें बांधिली आहे.

उदैपूर प्रशस्तीचे नांव पूर्वीं या पुस्तकांत ठिकठिकाणीं आलें आहे. हा प्रशस्तीरूप शिलालेख हल्लीं या मंदिरांतच आहे. हें शिवालय बांधण्यास इ. स. १०५९ त आरंभ होऊन तें १०८० पूर्ण झालें * उदयादित्या पासून या घराण्याचे वैभव सागरास ओहटी लागली पुनः पूर्ण भरतीचा योग आलाच नाहीं. उदयादित्यानंतर त्याचा वडील मुलगा

## लक्ष्मदेव [ बारावा राजा ]

याजकडेस राज्याधिकार आला. नागपूर प्रशस्तींत या राजाच्या पराक्रमाचें बरेंच वर्णन केलें आहे. याने अंग, चोल पांडय व चेदि इत्यादि राजांवर स्वाऱ्या करून विजय मिळविले तुरुष्क म्हणजे मुसलमानासही लक्ष्मदेवाकडून अप-

इ. स. १०८६–११०४

* या देवळाचा साधा नमूना कोणास पहावयाची इच्छा असल्यास त्यानें इंदूर येथील पुलाजवळील नवीन छत्र्या पहाव्या.

जय मिळाल्याचें वरील प्रशस्तींत लिहिलें आहे. यावरून हा राजा बराच पराक्रमी असावा असें दिसतें *

## नरवर्म देव [ तेरावा राजा. ]

लक्ष्मदेवानंतर त्याचा धाकटा भाऊ नरवर्मा देव यास राज्य मिळालें. याची कारकीर्द उदयादित्याप्रमाणेंच चांगली भरभराटीची राहिली. यानें गौड व गुजराथदेशचे राजांवर स्वाऱ्या करून जय संपादन केलें हा भोजदेवाप्रमाणेंच विद्वप्रिय असुन औदार्यादि गुणासंबंधानें याचीही बरीच कीर्ति आहे. यासही पंडितांचे वादविवाद ऐकण्याची भोजदेवाप्रमाणेंच फार आवड होती. याचेवेळीं रत्न सूरि नायक एक जैन पंडित व विद्याशिववादी या उभयतांत उज्जयिनी येथें श्री महाकालाचे देवालयांत मोठा वादविवाद झाला होता हा स्वतः चांगला संस्कृतज्ञ असून कांहीं प्रशस्त्यांचा कर्ता असल्याबद्दल त्याची ख्याती आहे. परमारां संबंधानें प्रसिद्ध असलेली नागपूरी प्रशस्ती ही नरवर्म देवाचीच कृती आहे. नरवर्म देवानंतर त्याचा पुत्र

## यशोवर्मदेव [ चौदावा राजा ]

हा राज्य पदारूढ झाला. उदयादित्यानें आपल्या पराक्रमानें जें ऐश्वर्य मिळविलें होतें. तें यावेळीं अगदीं लयास जाण्याची वेळ येऊन ठेपली. गुजराथचा राजा सिद्धराज जयसिंह हा यावेळी फार प्रबल होता. त्याचे सर्व बाजूंनी आपले राज्य वाढविण्याचे सारखे प्रयत्न चालले होते. या मुळें माळव्यावर त्याचे वारंवार हल्ले येत होते. माळव्यांतील परमारांचे गुजराथेंतील राजांशी पूर्वींपासूनच शत्रुत्व चालत आल्यानें यशोवर्म देवही वेळोवेळी गुजराथेवर चाल करून जात होता. एकदा सिद्धराज जयसिंह हा आपले

इ. स. ११३३–११४२

* मध्यप्रांतांत वाइन गंगेच्या खाऱ्यांत व चांदा डिस्ट्रिक्टमध्यें या व पुढील राजांच्या वेळचे शिलालेख कोठे कोठे सांपडतात. ( ज्ञान कोशाकरितां जमविलेल्या माहितीवरून ) त्यांवरून लक्ष्मदेवानें नागपूर येथें कांहीदिवस राज्य केलें असावें. धारच्या परमार घराण्याच्या कांहीं शाखा मध्यप्रांतांत जाऊन राहिल्या व तेथून त्यांच्या शाखा दक्षिणेकडे गेल्या असाव्यात व त्यांपासूनच दक्षिणेंतील पवारांची घराणीं उत्पन्न झाली असावीत या सूत्रानें त्यांचा माग धारेपर्यंत पुनः येऊन पोहोचुं शकतो. आणि फलटणच्या निंबाळकर पवारांनीं तसे आपल्या इतिहासांत सिद्ध करूनहि दाखविले आहे.

मातुश्रीसह सोमेश्वरचे यात्रेस गेला होता. तेव्हां त्यानें राज्याचा सर्व कारभार आपला जैन मंत्री शांतु याजकडे सोंपविला होता. अशी ही संधी साधून यशोवर्मदेवानें गुजराथेवर स्वारी केली. यावेळीं शांतु याजवळ पुरेसें सैन्य नसल्यानें यशोवर्मदेवाशीं लढाई देण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नव्हेंत यामुळें त्यानें यशोवर्मदेवास कांहीं तरी नजर नजराणें वगैरे देऊन परत लाविलें.

यशोवर्मदेवानें आपलें मागें येऊन स्वारी केली व यश संपादन केलें हें सिद्धराज जयसिंह यास बरें वाटलें नाहीं त्यानें लागलींच यशोवर्माचा सूड उगवून माळवा प्रांत सर करण्याची तयारी चालविली व तीमुळें दोन्हीपक्षांच्या वरचेवर लढया होत होत्या. अशा रीतीनें सिद्धराजाचे माळवा प्रांत जिंकण्याचें सतत प्रयत्न चालले होते. परंतु याच सुमारास त्यानें प्रसिद्ध सहस्त्रलिंग नांवाचा तलाव खोदून बांधविण्याचेंही काम सुरू केल्यामुळें तलावाचें काम पुरें होईपर्यंत त्यास माळव्यावर स्वारी करण्यास सवड झाली नाहीं. इकडे यशोवर्मानें सिद्ध-राज हा सहस्त्रलिंग तीर्थ बांधविण्याचे कामांत गुंतला आहे असें पाहून एकदम गुजराथेवर चाल केली; तेव्हां अर्थातच सिद्धराज जयसिंहास तलावाचें काम बाजूस ठेऊन यशोवर्मावर चालून यावें लागलें. सिद्धराजानें आपले आसपासचे राजांसही जिंकून त्यांस आपले आधीन करून घेतलें होतें. त्या सर्वांचे मदतीनें तो एकदम मोठ्या तयारीनें माळव्यावर चालून आला. त्यानें उज्जयिनी येथें आपले सैन्याचा तळ दिला होता. जयसिंहानें तेथें राहून कित्येक वर्षें धारेवर मारा चालविला परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. अखेरीस गुप्तहेराकडून धारेवर दक्षिण बाजूकडून हल्ला केल्यास खास विजय प्राप्ती होईल अशी बातमी कळल्यावरून त्यानें त्या बाजूनें हल्ला केला व आपल्या यशःपटहनावाच्या हत्तीच्या साहाय्यानें तटाचे दरवाजे फोडून सिद्धराजानें धारेंत प्रवेश केला. या स्वारींत मालवराज यशोवर्म देव याचा पूर्ण पराभव झाला. गुजराथचे सैन्यास परतवि-ण्यासाठीं चालून गेलेल्या भिल्लाचे सैन्याचा सिद्धराजाचा जैन मंत्री शांतु यांने चांगलाच समाचार घेतला. जयसिंहाचा पुतण्या मोसल यानें यशोवर्मदेवाचा मुलगा महाकुमार यास ठार मारिलें. अशारीतीनें या स्वारींत यशोवर्मदेवास पराजय मिळून त्यास सिद्धराजाचे स्वाधीन व्हावें लागलें. सिद्धराजानें त्यास कैद करून आपली राजधानी अनहिलवाडपट्टण येथें नेलें. व तेथें सहकुटुंब त्या करवीं कडक करागृहवास भोगविला; व माळव्याचें राज्य गुजराथचे राज्यास जोडून आपल्या मंत्र्यापैकीं जिनचंद्र यास माळव्यावर दंडपती ( सुभेदार ) नेमून पाठविलें.

गुजराथ व माळवा या दोन्ही प्रांताचे राजांत जुंपलेलें हें युद्ध सुमारें १२ वर्षें चाललें होतें. या स्वाऱ्यांचा आरंभ नरवर्मदेवाचे कारकिर्दींत होऊन अखेर यशोवर्माचेवेळीं झाली. या उभय राजांत ही लढाई इतक्या मोठ्या काळपर्यंत चालू राहिल्यानें गुजराथचे राजास आपली तरवार कित्येक वर्षें म्यानाबाहेर नागवी वागवावी लागली. या गोष्टीचा सिद्धराज जयसिंह यास फार त्वेष येऊन त्यानें असा पण केला होता कीं, "मालवराजास जिंकून त्याचे कातड्याचें म्यान करून आपले तरवारीस बसवीन" दैवाचे अनुकूलतेनें केलेला पण सिद्धीस नेण्याचीही संधी आली. मालवराजावर या मिळविलेल्या विजयाचा उत्सव संपल्यावर सिद्धराजानें आपला पण आपला मंत्री शांतु यास कळविला. तेव्हां मंत्र्यास मोठी पंचाइत पडली; शेवटीं कांहीं दिवस लोटल्यावर त्यानें सिद्धराज यास विनंति केली कीं, महाराज यश अपयश हें कोणाचे स्वाधीन नाहीं. यशोवर्मदेवानें कित्येक वर्षेंपर्यंत आपणास एकसारखा उपद्रव दिला ही गोष्ट खरी आहे. परंतु तो आतां राज्यभ्रष्ट होऊन आपला कैदी बनला आहे. त्यास त्याचे अपराधाबद्दल योग्य शासन मिळालें आहे. यावर आपण आपला पण अक्षरशः सिद्धीस नेण्याचा विचार केल्यास आपली अपकीर्ति होईल याचा विचार व्हावा. आपण आज्ञा कराल तर मी एक तोड सुचवीन. आपण आपल्या तरवारीस इतर कातड्याचें म्यान करवून यशोवर्माच्या टाचेजवळील थोडेंसें कातडें काढून त्यास लावावें. म्हणजे झालें! यांत आपला पणही सिद्धीस जाऊन आपल्या बरोबरीचे राजाची आपण विटंबना केली नाहीं अशी आपली कीर्ति होईल! ही सल्ला सिद्धराजास पसंत पडली व पुढें त्याप्रमाणेंच करून त्यानें आपला पण सिद्धीस नेला.*

असेंही सांगतात कीं सिद्धराजजयसिंहानें यशोवर्मदेवास अनहिलवाडपट्टण (हल्लींचें कडीपट्टण) येथें एके लांकडी पिंजऱ्यांत कैदेंत ठेविलें होतें व त्यास फारच अपमानानें वागविलें जात होतें. यशोवर्माच्या सुटकेकरितां एकसारख्या विनवण्या चालल्या होत्या. परंतु त्याकडे सिद्धराजानें मुळींच लक्ष दिलें नाहीं. हा केवळ दैवदुर्विपाकच म्हटला पाहिजे!

अखेरीस यशोवर्मदेवानें अजमेरच्या चौहान राजाचें मदतीनें जयसिंहाशीं मेळ करून कैदेंतून आपली सुटका करून घेतली. व आपले राज्यांतील कांहीं

* प्रबंध चिंतामणी—मेरु तुंगाचार्य कृत.

भाग परत मिळविला. सिद्धराज जयसिंह इ. स. ११४२ त वारला. यशोवर्मदेवही यावर फार दिवस वांचला नाहीं.

यानंतर कांहीं काळपावेतों माळव्यावर परमारांचा अधिकार नव्हता. गुजराथेंतील चौलुक्य राजांचेच हातीं माळव्याची सत्ता राहिली. यशोवर्मदेवानंतर त्याचे दोघे मुलगे जयवर्म व अजयवर्म या उभयतांत गृहकलहास सुरवात झाली व त्यामुळें परमारांच्या दोन शाखा होऊन निरनिराळे भागांवर राज्य करूं लागल्या.

पहिल्या ( जयवर्मांकडील ) शाखेचा अधिकार भेलसा व नर्मदा यांचे दरम्यान होता व दुसरी ( अजयवर्माची ) शाखा धारचे आसपासचे भागावर राज्य करीत होती. या दोन्ही शाखांत कांहीं दिवस झगडे होत राहिले. धारचे आसपास राज्य करणारे शाखेंत.

अजयवर्म ( इ. स. ११४४–६० )
विन्ध्यवर्म ( इ. स. ११६०–८० )
सुभटवर्म ( इ. स. ११८०–१२१० )
अर्जुनवर्म ( इ. स. १२१०–१६ )

असे चार राजे इ स. १२१६ पर्यंत झाले. यांतील **विंध्यवर्म देवानें** गुजराथचें आधिपत्य झुगारून देण्याचा प्रयत्न केला. इ. स. ११७६ त यावेळचा गुजराथचा राजा अजयपाल मरण पावला. तेव्हां अर्थातच गुजराथचा माळव्यावरील अधिकार शिथिल पडला. व विन्ध्यवर्म देवानें माळव्यांतील कांहीं भागावर पुनः आपला अधिकार कायम केला. तथापि यशोवर्मदेवाचे वेळेपासूनच परमारांस गुजराथचें मांडलिकत्व पत्करावें लागलें होतें. त्यांस माळव्याची पूर्ण सत्ता लाभली नाहीं.

विन्ध्यवर्महीं मोठा विद्यानुरागी राजा होता बिल्हण * नांवाचा कवि हा त्याचा मंत्री होता. विन्ध्यवर्मदेवाचा एक शिलालेख मांडव येथें सांपडला आहे त्यांत

विन्ध्यवर्मनृपतेः प्रसादभूः
सांधिविग्रहिक बिल्हणः कविः ।

* विक्रमांकदेवचरित कर्ता बिल्हण तो हा नव्हे; त्याहून हा कोणी अन्य बिल्हण कवी आहे.

असा उल्लेख आहे यावरून हा विल्हण कवि विन्ध्यवर्मदेवाचा कृपापात्र होता असें उघड सिद्ध होतें. आशाधर नावाचा एक जैन पंडित या वेळेस विन्ध्यवर्मदेवाचे आश्रयास येऊन राहिला होता. आशाधर हा नलकच्छपुर ( हल्लींचें नालछा ) येथें नेमिनाथाचे मंदिरांत राहत असे. त्यानें येथें राहून निरनिराळे शास्त्रांत कित्येक पंडित तयार केले. या आशाधरानें कांहीं जैन-धर्म विषयक व दुसरे वैद्यशास्त्र, अलंकारशास्त्र वगैरे विषयांवर ग्रंथ लिहिलेले प्रसिद्ध आहेत. विन्ध्यवर्माचे मागें

**सुभटवर्म** [ सतरावा राजा ]

याकडेसें अधिकार आला. यानें अनहिलवाडचा राजा भीमदेव ( २ रा ) याचा पूर्ण मोड केला असा उल्लेख अर्जुनवर्मदेवाचे

इ. स. ११८०–१२१० प्रशस्तींत आहे. सुभटवर्मानंतर त्याचा पुत्र

**अर्जुनवर्मदेव** [ अठरावा राजा ]

हा सिंहासनारूढ झाला. हाही मोठा पराक्रमशाली होता. ज्याप्रमाणें भोजदेवाचें चेदिराज गांगेयदेवाशीं युद्ध झालें व त्यांत भोजदेवानें

इ. स. १२१०–१२१६ गांगेयदेवाचा पराभव केला त्याप्रमाणेंच याचें व गुज-राथचा राजा जयसिंह याचें युद्ध पावागड नजीक झालें त्यांत अर्जुनवर्मदेवानें गुजराथचे राजाचा पूर्ण पराभव केला. या युद्धाची हकीगत याचे वेळच्या ‘पारिजातमंजरी’ नामक राजप्रशस्तिरूप नाटिकेंत आली आहे. ही प्रशस्ति धारानरेश अर्जुनवर्मदेवाच्या वरील विजयाप्रीत्यर्थ राजगुरू बालसरस्वती मदन यानें रचून शिलेवर कोरली होती तींत अर्जुनवर्म देवाचें वर्णन “ हा सर्वगुणांत प्रतिभोज होता ” असें केलें आहे. हा चांगला कवि व गानकलानिपुण होता. यानें गायनकलेस चांगलें उत्तेजन दिलें. या राजाची अमरु शतकावर रसिक संजीविनी नांवाची टीका प्रसिद्ध आहे. या टीकेवरून याची विद्वत्ता प्रत्ययास येते. अर्जुनवर्मदेव निपुत्रिक असल्यामुळें याचे नंतर राज्याधिकार भेलसा व नर्मदा यांचे दरम्यान राज्य करणाऱ्या परमाराचे शाखेंतील पुरुषाकडेसच जाऊन दोन्ही शाखा एकवटल्या.

## देवपालदेव [ एकोणिसावा राजा ]

अर्जुनवर्मदेवानंतर देवपाल देव हा राज्यावर आला. याचेकडेस भेलसा वगैरे कडील मुलुखही कायम असून शिवाय धारेकडील

इ. स. १२१६–१२४०

मुलुखाचेंही स्वामित्व यास मिळालें. देवपालदेवाचें दुसरें नांव साहसमल्ल असें होतें. या राजाचे वेळीं माळव्याचे आसपास मुसलमानांचे हल्ले सुरू झाले. इ. स. १२३२ मध्यें दिल्लीचा बादशाह शमसुद्दीन अल्तमश यानें ग्वालेर घेतलें व त्यानंतर तीन वर्षांनीं म्हणजे इ. स. १२३५ त त्यानें भेलसा व उज्जयिनीवर स्वारी करून पुष्कळ लूट मिळविली. व महांकालाचे मंदिराचा विध्वंस करून मंदिरांत असलेल्या कित्येक मूर्ति व विक्रमादित्याचा पुतळा दिल्लीस नेला.

हल्लीं इंदूरचे राज्यांत देपाळपूर नांवाचा गांव आहे तो या देवपालदेवानेंच वसविला असून तेथील विस्तीर्ण तळेंही यानेंच बांधलेलें आहे.

देवपाल देवानंतर

| | |
|---|---|
| १ जयतुगिदेव ( जयसिंह २ रा ) | इ. स. १२४०–१२५६. |
| २ जयवर्मदेव ( २ रा ) | इ. स. १२५६–१२६१. |
| ३ जयसिंहदेव ( ३ रा ) | इ. स. १२६१–१२८०. |
| ४ भोजदेव ( २ रा ) | इ. स. १२८०–१३१०. |
| ५ जयसिंहदेव ( ४ था ) | इ. स. १३१० |

असे पांच राजे झाले यांतील

## जयसिंहदेव ३ रा [ बावीसावा राजा. ]

याचे वेळीं धारेवर मुसलमानांचे हल्ले वारंवार होऊं लागल्यामुळें त्यानें आपली राजधानी धारेहून मांडवगडास नेली. मांडव ही जागा

इ. स १२६१–१२८०

चांगली बंदोबस्ताची असून तेथें राजधानी कायम झाल्यानें त्याकालीं कांहीं दिवस मांडवची चांगलीच भरभराट झाली. जयसिंहानें मांडवगडाचीही दुरुस्ती केली असून तेथें त्यावेळीं पुष्कळ मोठमोठ्या सुंदर इमारती व बाजार पेठा व सुंदर जैन मंदिरें बांधविलीं गेलीं. या राजाचा मंत्री पृथ्वीधर नांवाचा जैन वाणी होता. याचें लोकांत पेथड-कुमार हें नांव प्रसिद्ध आहे. नुकताच सुकृतसागर नांवाचा एक जैन ग्रंथ उपलब्ध झाला आहे त्यांत या पेथडकुमाराच्या धर्मकृत्याच्या पुष्कळ आख्यायिका दिल्या

आहेत. पृथ्वीधर ऊर्फ पेथड कुमार हा श्वेतांबर जैन होता. हा स्वतः फार श्रीमंत असून याचें त्याचे आंगच्या गुणांनीं राजावर बरेंच वजन होतें. यामुळें त्यावेळीं तो एक मुकुटसिंहासनादिराजचिह्नरहित राजाच बनून गेला होता असें म्हटलें तरी चालेल. यानें पुष्कळ पैसा खर्च करून हिंदुस्थानभर ठिकठिकाणीं जैन देवालयें व धर्मशाळा बांधून गरीब लोकांस अन्नदान मिळण्याची व्यवस्था केली होती. यानें सुमारें ८८ ठिकाणीं अशीं देवालयें बांधविलीं होतीं असें म्हणतात. महाराष्ट्रांत यादवांचे राज्यांत देवगिरी ( दौलताबाद ) येथेंही जाऊन यादव राजाचा प्रसिद्ध मंत्री हेमाद्रि ऊर्फ हेमाडपंत याचे मेळानें तेथें एक टोलेजंग मंदिर बांधलें तेव्हां त्यास कृतकृत्यता वाटली.

---

* जैनधर्माचा प्रचारः–श्रीभोजदेवापासून म्हणजे ११ व्या शतकापासून गुजराथेप्रमाणें माळव्यांतही जैनधर्माची व त्यांतही श्वेतांबर पंथाची अभिवृद्धि झाली. पुढील मुसलमानी अमलांत देखील तो धर्म टिकाव धरून राहिला. त्या धर्माचे अनुयायी या प्रांतांत तर बहुधा वैश्य असतात. ते धनिक असल्यामुळें जुलमी बादशहास देखील अडचणीच्या प्रसंगीं त्यांस राजी ठेवावें लागे. शिवाय ते वेतसी वृत्ती वेळेवर धारण करीत. दाबांत दबावें, व तो कमी होतांच डोकें उंच करून उभें राहावें. वारा वाहील तसें वांकावें पण मूळ सोडूं नये. या स्वभावामुळें ते संकटांतून पार पडत. अविचाराच्या प्राबल्यांत त्यांचीं देवळें व त्यांतील प्रतिमांचा विध्वंस होई आणि अनुकूल परिस्थिती प्राप्त झाली कीं तत्काल ते द्रव्यबलानें हर्म्यप्रासादवापिकूपपुष्करण्या निर्माण करीत आणि त्या सर्वांवर लेख कोरून ठेवीत. त्यांच्या भग्नावशेषांत हे त्यांचे लेख विपुल सांपडतात. त्यांची पूर्वेतिहासास मोठीच मदत मिळते. जैन यतींस ग्रंथभांडार बनविण्याचा मोठा नाद असे. त्या भांडारांत ते जैनेतर वैदिक धर्मीयांचे देखील ग्रंथ संग्रहीं ठेवीत त्यापासूनही पुष्कळ लाभ होतो. असें एक भांडार नलकच्छपूर ( नालच्छा ) येथें होतें. या भांडारांत गुजराथेंतील पाटन येथील भांडार फार प्रसिद्ध आहे. त्यांतील महत्वाचे ग्रंथ श्री. गायकवाड महाराज हल्लीं छापवून प्रसिद्ध करीत आहेत.

इंदूर येथील विद्वान माणकचंदजी जति हल्लीं मक्षी येथील जैनदेवालयाच्यासंबंधानें ग्रंथ लिहून छापीत आहेत त्यांत त्यांनीं माळव्यांतील उत्कीर्ण जैन लेखकांचा चांगला संग्रह केला आहे त्यापासून त्या धर्माचे व साधारण इतिहासास देखील फार मदत मिळण्याचा संभव आहे. पृथ्वीधराप्रमाणें पुढें मुसलमानी अमदानींतही कांहीं श्वेतांबरी जैन साहुकार घराणीं फार वैभवास चढलीं. कित्येकांनीं मांडवच्या कांहीं बादशहांचें मंत्रित्व केलें. अशा सावकारापैकीं गदासा भैसासा याच्या वाड्याचा भव्य अवशेष अद्याप मांडव येथें उभा आहे. दुसऱ्या एका जैन मंत्र्याचें सूर्यकुंड तारापूर दरवाज्याजवळ आहे.

**भोजदेव ( २ रा )** [ तेविसावा राजा ]

हा राज्यपदारूढ झाला. याचे वेळीं अजमेरचे चौहानापैकीं—रणथंभोरचा राजा हम्मीर यानें स्वारी करून तींत भोजदेवाचा पराभव केला. हम्मीर महाकाव्याचे ९ वे सर्गाचे १८ व्या श्लोकांत या भोजराजाचें व धारेचें " भोजो भोज इवापरः " व " धारां धरासारां " असें वर्णन केलें आहे यावरून हा भोजदेवही पराक्रमी व कवी आणि विद्वानांचा चाहता व आश्रयदाता होता व याचे वेळीं धार ही चांगल्या स्थितींत होती असें दिसतें.

**इ. स. १२८०–१३१०**

या भोजदेवाचे वेळीं ज्ञानेश्वर नामदेव वगैरे महाराष्ट्रीय संत मंडळी उत्तरेस यात्रेसाठीं जात असतां उज्जयनी, धार व मांडव येथें आली होती, व याठिकाणीं त्यांनीं कांहीं चमत्कार केल्याची माहिती मिळते. मांडवास तर हल्लीं नामदेव मठी म्हणून एक स्थानही आहे असें म्हणतात.*

**जयसिंह देव** ( चतुर्थ ) [ चोविसावा राजा ]

हा या परमार वंशातील शेवटला राजा होय. याचे वेळींच माळव्यावर मुसलमानांचा पूर्ण अम्मल प्रस्थापित झाला. भोजदेव दुसरा याचे वेळेपासूनच माळव्यांत मुसलमानांची सत्ता प्रबल होत चालली होती व तीमुळें माळव्यांत निरनिराळीं लहान लहान राज्यें निर्माण झालीं होतीं. हिजरी स. ७०४ ( इ. स. १३०५ ) चे सुमारास दिल्लीचा बादशहा अल्लाउद्दीन खिलजी याचा सरदार

* ज्ञानेश्वर महाराज धार व उज्जयिनी या दोन्हीं स्थळीं आले होते. त्याबद्दलची एक मनोरंजक आख्यायिका रा. ल. रा. पांगारकर यांनीं आपल्या ज्ञानेश्वर चरित्रांत दिली आहेः—" ज्ञानेश्वर महाराज तीर्थयात्रा करीत सातपुड्यांत आले. तेथें त्यांस एक भगवद्भक्त भिल्ल भेटला. साधु संतांस पीडा द्यावयाची नाहीं असें त्याचें व्रत होतें. त्यानें या संतमंडळीचें योग्य आतिथ्य करून त्यांस सुखरूप धारेपर्यंत पोहचविलें. येथें कमलाकर भट्ट नांवाच्या ब्राह्मणाच्या घरीं ही संत मंडळी उतरली. त्याचा गोपाळ नांवाचा पुत्र सर्पदंशानें मृत झाला. त्यास ज्ञानेश्वर महाराजांनीं उठविलें. तेथून उज्जयिनीस गेले. वीर मंगळनांवाचा प्रख्यात राजाश्रित ज्योतिषी सात वर्षें दुग्ध प्राशन करून त्यांच्या आगमनाची वाट पहात राहिला होता त्याच्याच घरीं ते राहिले. तेव्हां त्यानें त्यांचा सत्कार करून त्यांच्या चरणीं गुरू भक्तीनें देह समर्पिला. महाराजांनीं स्वहस्तानें त्याला समाधी दिली व त्यावर शिवलिंगाची स्थापना केली. तें स्थान मंगळेश्वर नांवानें प्रसिद्ध असून अद्याप उज्जयिनीच्या बाहेर संदीपनाच्या आश्रमाजवळ आहे.

—ज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र पृष्ट १०५–१०६.

ऐनुलमुल्क माळव्यावर चाल करून आला होता. त्यावेळीं माळव्यांतील कोणी कोक राजानें त्याच्याशीं चाळीस हजार घोडेस्वार व १ लक्ष पायदळानिशीं सामना केला होता; परंतु त्याचा टिकाव न लागल्यानें पुढें लौकरच उज्जयिनी, धार, मांडू व चंदेरी शहरें ऐनुल्मुल्कानें काबीज करून घेतलीं. या वेळेपासून माळव्यावर मुसलमानांची सत्ता होऊन परमारांचे राजसत्तेचा शेवट झाला.

सारांश या परमार वंशाची सुमारें ५०० वर्षं माळव्यावर सत्ता राहिली. या अवधींत त्यांच्या २५ पिढ्या झाल्या. या प्रसिद्ध वंशांत मुंजभोज इत्यादि राजांनी फारच कीर्ति मिळविली. भोजदेवाचें नांवतर सर्व भरतखंडभर व बाहेरही विक्रमादित्याचे बरोबरीनें प्रसिद्ध आहे. क्षत्रियांस अवश्य असलेल्या शौर्य, औदार्य, राजकारणपटुता इत्यादि गुणांशिवाय परमारवंशीय राजांत विद्येची आवड व विद्वत्प्रियता हे गुण विशेषत्वानें होते. इतकेंच नव्हे, तर हे गुण परमारांचे एक आनुवंशिक शील होऊन बसले होते. मुंजभोज व अर्जुनवर्मदेव हे राजे तर स्वतः चांगले विद्वान्, पंडित व कवि असून त्यांनीं पुष्कळसे संस्कृत ग्रंथही लिहून ठेविले आहेत व ते चांगले विद्वन्मान्य आहेत. यांचे कारकिर्दीत विद्वानांची व कवींची फार चहा होती. त्यांस राजाश्रय चांगला मिळत असे व यामुळें लोकांतही विद्येचा प्रसार फार झाला होता. याकाळीं संस्कृत वाङ्मयाचा पुष्कळ प्रचार होता. या कालांत मोठमोठे पंडित व कवि उदयास आले. त्यांजपासून निघालेल्या रमणीय काव्यनिर्झराचा प्रवाह अद्यापही भरतखंडांतील व भरतखंडाबाहेरील विद्वान लोकांस तल्लीन करून सोडीत आहे. त्यावेळीं कलाकौशल्याचीही चांगली ऊर्जितावस्था झाली होती; त्यावेळच्या सुंदर इमारती, देवालयें वगैरेंचें अवशेष हल्लीं धार, मांडव, उज्जयिनी वगैरे ठिकाणीं पाहावयास सांपडतात. वरील ठिकाणीं परमार राजांचेवेळचे शिलालेख आहेत. त्यांचीं अक्षरेंही फार सुंदर व प्रेक्षणीय आहेत. यावरून दगडावर अक्षरें कोरण्याचें काम करणारे लोकही चांगले शिकले सवरलेले होतेसें दिसतें. वरील उत्तमोत्तम गुणामुळें परमारांचें नांव सर्व हिंदुस्थानांतील राजांत फारच उच्च प्रतीचें गणलें जात असून धारचे परमार राजे हे त्याकाळीं माळव्याचे सार्वभौम मानिले जात असत.

परमारांचें राज्य त्यांचे पूर्ण उत्कर्षाचे वेळीं पूर्वेस भेलशापासून पश्चिमेस गुजराथेपर्यंत व उत्तरेस मंदसोरपासून खालीं तापी नदीपर्यंत किंवा तिच्या दक्षिणेस गोदावरीपर्यंत पसरलें होतें.

परमारांचेवेळीं राज्यव्यवस्थेच्या सोईसाठीं जे राज्याचे विभाग पाडले होते, त्यांस मंडळ असें म्हणत असत व त्यांवरील अधिकाऱ्यांस मंडलेश्वर असें नांव होतें. मंडलाचे विभागास प्रतिजागरणक (परगणा) व परगण्याचे विभागास पथक ( हल्लींचें ठाणें, टप्पा ) म्हणत असत. प्रत्येक गांवचा एक मुख्य मनुष्य मानला जात असे त्यास पट्टकिल ( पाटील ) असें नांव होतें. मंत्र्यास किंवा दिवाणास सांधिविग्रहिक ( Minister of peace and war ) म्हणत असून हा हुद्दा बहुधा ब्राह्मणाकडेसच असे. सिंधुराजाचे वेळेपर्यंत उज्जयिनी परमारांची राजकीय राजधानी होती; परंतु पुढें भोजदेवाचे कारकीर्दीपासून राजधानीचें मुख्य ठिकाण धार हें झालें. धारानगरीवर भोज राजाचें विशेष प्रेम होतें.

राजास " परमभट्टारकमहाराजाधिराज परमेश्वर " अशा पदवीनें लिहिण्याचा संप्रदाय होता. भोजदेवास तर " मालवचक्रवर्त्ति, " व " धारेश्वर " हींहीं नांवें होतीं. बापाचे मागें बहुत करून वडील मुलगा राज्याचा हक्कदार होत असे.

परमारांचे मुद्रेवर ( शिक्क्यावर ) मुख्यतः गरुड आणि सर्प यांचीं चिन्हें असत.

परमार राजे बहुतेक शिवशक्तीचे उपासक असून उज्जयिनी येथील महाकाल व धार येथील श्री कालिकादेवी हीं त्यांचीं मुख्य उपासक दैवतें होतीं. जैनधर्माकडेसही परमारांचें बरेंच लक्ष होतें तथापि ते स्वतः कधीं जैनधर्मी झाले नाहींत. त्या कालीं लोकांत जैनधर्माचा बराच प्रसार झाला असल्यानें जैन पंडितांचे वादविवाद ऐकण्याचें मात्र परमार राजांस मनापासून आवडत असे.

या राजांनीं ब्राह्मणास वेळोवेळीं दिलेलीं दान पत्रें उपलब्ध झालीं असून आणखीही शोधाअंतीं पुष्कळ सांपडण्याचा संभव आहे, या दानपत्रांवरून परमार राजांचें चांगलें दानशूरत्व व्यक्त होतें.

---

# धार संस्थानचा संक्षिप्त प्राचीन इतिहास.

## भाग २ रा.

### माळव्याचे-मांडवचे-सुलतान.

माळव्यांत परमार राजा अर्जुन वर्मदेव याचे कारकिर्दीचे पूर्वीच दिल्लीचा गुलाम वंशीय सुलतान अल्तमश याचे हल्ले होऊं लागले होते. वेळोवेळीं सुलतान किंवा त्याचे सरदार यांनीं माळव्यांत येऊन लुटमार करून मिळेल तितकें द्रव्य घेऊन जावें असाक्रम कांहीं दिवस चालू होता. आरंभीं आरंभीं मुसलमानांस माळव्यांत आपलें ठाणें देण्यास फार प्रयास पडले. कारण काटक व वैतसी वृत्तीच्या रजपुतांशीं त्यांस भिडावें लागे. प्रथम ठाणें बसलें तथापि सत्ता प्रस्थापित हात नसे. फौजेचा तळ हलला कीं, अम्मल डळमळला, असें होत असे. मुसलमान लोक हिंदूपेक्षां आधिक विक्राळ होते खरे, परंतु राज्यशकट चालविण्याच्या कलेंत ते युरोपियनांप्रमाणें हिंदूपेक्षां तरबेज नव्हते हें खास. इ. सन १२३५ त सुलतान अल्तमश यानें माळव्यावर स्वारी करून उज्जैन, भेलसा, ग्वालेर वगैरे शहरें घेतलीं व माळवाप्रांत दिल्लीचे अंमलाखालीं आणिला. याचवेळीं त्यानें उज्जयनी येथील सर्व पुरातन व सुंदर मंदिरांचा व राजगृहांचा विध्वंस करून श्रीमहाकालाचे देवालयांत असलेला विक्रमादित्याचा सुवर्णाचा पुतळा पळविला. यानंतरही माळव्यावर मुसलमानांचे वेळोवेळीं हल्ले होतच होते. दिल्लीचा बादशहा जलालुद्दीन फिरोजशहा खिलजी यानें इ. स. १२९१ त उज्जयनी पुन्हा काबीज करून कित्येक देवालयांचा व मंदिरांचा विध्वंस केला. त्या नंतर पुनरपि दोनवर्षांनीं म्हणजे इ. स. १२९३ त त्यानें माळव्यावर चाल केली व पुष्कळ लूट नेली. या वेळींच त्याचा पुतण्या अल्लाउद्दीन हा दक्षिणेंत देवगिरीचे जाधवांवर चालून जात असतां त्यानें रस्त्यांत माळवा प्रांतावरही बराच धुमाकूळ घातला व कांहीं किल्ले व भेलसा वगैरे ठिकाणें काबीज करून व पुष्कळशी

लूट मिळवून पुढें तो दक्षिणेंत गेला. व तिकडे देवगिरीचा राजा रामदेवराव जाधव याचा पराभव करून त्याजकडून कांहीं वार्षिकखंडणी कबूल करून घेऊन तो दिल्लीस परत आला. देवगिरीचे जाधवांकडून कांहीं वर्षांनीं खंडणीचा वसूल बराबर येईनासा झाला, तेव्हां पुनः ई. स. १३०६ चे सुमारास देवगिरीवर मुसलमानांची स्वारी झाली; या स्वारीचे वेळींही माळव्यांतील मुलुखाची फारच नासाडी झाली. याप्रमाणें वारंवार मुसलमानांचे माळव्यावर हल्ले होत गेल्यानें, साहजीकच माळव्यांत त्यांची सत्ता बळावत चालली.

तथापि यावेळेपर्यंत परमार राजे धार व मांडव येथें किंवा आसपास जेथें जीव धरून राहवेल तेथें राहून राज्याचें नांव चालवीत असत. मन्त्रि पृथ्वीधर याचे सहाय्यानें जयसिंह देवाचा मंडपदुर्ग येथील वास याच धोरणाचा असावा असें वाटतें.

पुढें दिल्लीची बादशाहत तुघलक घराण्याकडेस गेल्यावर दिल्ली दरबाराकडून या प्रांतांत सुभा नेमून पाठविण्याची व्यवस्था अमलांत आली. ग्यासुद्दीन तुघलखाचे वेळीं इ. स. १३२२ त शेरखान नांवाचा सुभेदार नेमला गेला असून पुढें नासिरुद्दीनचे कारकिर्दींत येथील सुभेदारी मलीक अजीज यास मिळाली होती.

इ. स. १३४४ त महम्मद तुघलक हा दक्षिणेंत देवगिरीवर चालून जात असतां कांहीं दिवस धारेस राहिला होता. त्यावेळीं येथें दुष्काळ पडला असून त्यामुळें या प्रांतांतील लोकांची फार दैना उडाली होती. याचवेळीं महम्मदानें धार येथील किल्ला बांधविला व माळव्याचा सारा इलाखा अजीज हिमार याचे स्वाधीन केला. या अजीज हिमारासच त्यानें प्रथमतः धारेवर अधिकारी कायम केलें.

इ. स. १३८७ त फिरोजशहा तुघलक याचे पदरीं अमीदशहा दाउद उर्फ दिलावरखान घोरी नांवाचा एक सरदार होता. त्याची नेमणूक पुढें माळव्याचे सुभेदारीवर झाली. हाच दिलावरखानपुढें माळव्याचा स्वतंत्र सुलतान झाला. हा मूळचा घोर प्रांतातला राहणारा असून दिल्लीचा पहिला सुलतान शाबुद्दीन घोरी याचे वंशांतील होता. माळव्यांत याची नेमणूक झाल्यावर त्यानें मुलखांत अगोदर योग्य उपायांनीं शांतता राखून आपलें सुभायतीचें मुख्य ठिकाण धार येथें कायम केलें. फिरोजशहाचे मरणानंतर दिल्लींत बरेच बखेडे उपस्थित

झाले होते, त्यामुळें दिल्लीचे बादशाहतीची अंतर्गत स्थिती फारच बिघडलेली होती, ही संधि साधून गुजराथ व खानदेशचे सुभेदारांनीं आपला स्वतंत्र अम्मल सुरू केला. व त्याचप्रमाणें माळव्यावर स्वतंत्र सत्ता गाजविण्याविषयींचे दिलावरखानाचेही प्रयत्न सुरू झाले. तथापि दिलावरखान हा फार धोरणी व राजकारणकुशल असल्यानें या कामीं त्यानें दुसऱ्या सुभेदारांप्रमाणें घाई केली नाहीं. दिलावरखानाचा हा दिरंगाईपणा त्याचा मुलगा अलफखान यास मुळींच आवडला नाहीं. त्याचा स्वभाव उतावळ असल्यानें, आपला उद्दिष्ट हेतु लवकर तडीस न्यावा असें त्यास वाटत होतें, तथापि बापा पुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं.

इ. स. १३९८।९९ त तैमुरलंगानें दिल्लीवर स्वारी केली तेव्हां दिल्लीचा सुलतान महमूद तुघलक हा गुजराथेंत पळून गेला ( १७ डिसेंबर १३९८ ) परंतु गुजराथचे सुलतानानें त्यास आश्रय दिला नाहीं, तेव्हां त्यानें माळव्यांत येऊन दिलावरखान याजपाशीं आश्रय मागितला. दिलावरखानानें पूर्व नातें स्मरून त्यास फार सन्मानपूर्वक तीन वर्षें आपल्यापाशीं ठेऊन घेतलें व पुढें दिल्लीवरील आलेलें संकट नाहींसें झाल्यावर त्यास परत तेथें पोचतें केलें. यामुळें त्यास दिल्लीकडून त्रास न होतां उलटी बळकटीच मिळाली.

दिलावरखान स्वतंत्र होण्याविषयीं दिरंगाई करीत होताच त्यांत त्याणें महमूदशहास आश्रयास ठेविलें यामुळें तर अलफखानाचें चित्त फारच खवळलें. त्यास धारेस बापाजवळ राहणें देखील आवडलें नाहीं. तो लागलाच मांडवास जाऊन राहिला. व तेथून त्यानें स्वातंत्र्य मिळविण्याचे प्रयत्न चालविले. यावेळीं मांडव येथील किल्ल्याची डागडुगी करून तो विशेष मजबूत करण्याचें काम अलफ खानानें प्रथमतः हातीं घेतलें. व साऱ्या गडाचे भोंवती एक अजस्त्र *तट घालण्यास सुरवात करून तीन वर्षांचे अवधींत तें काम बरेंच रूपास आणिलें.

अलफखानानें केलेल्या याकामामुळें तर दिलावरखानाचे उद्दिष्ट हेतूस आणखी दुजोरा मिळाला. यावेळीं दिल्लीवर नुकतीच तैमुरलंगाची स्वारी झाल्यानें तेथील स्थिती फारच बिघडली होती. आसपासचे रजपुतांचेही दिल्लीवर हल्ले

---

* हा तट अद्याप कायम आहे. सुमारें १० फुट रुंद अशी काळ्या दगडाची ही एक भिंत असून स्थलाच्या उच्च नीचपणाप्रमाणें कांहीं ठिकाणीं हिची उंची ४० फुटां-पर्यंत असून कांहीं ठिकाणीं अगदीं जमिनीला लागून आहे.

होऊं लागले होते. तशांत महमूद शहाचे घरांत तंटे उपस्थित झाले असल्यानें तो अगदीं निर्बल झाला होता. अशा स्थितींत त्याजकडून कोणत्याही प्रकारचा अडथळा होणें शक्य नाहीं असें पाहून लागलींच दिलावरखानानें आपला हेतू पूर्ण करून घेतला. त्यानें आपण माळव्याचे स्वतंत्र सुलतान झाल्याचें जाहिर करून संप्रदायाप्रमाणें राजचिन्हें धारण केलीं. तसेंच आपल्या नांवानें खुद्बा पढण्या विषयीं हुकूम करून आपल्या नांवाचें नाणेंही पाडलें व आपलें राजधानीचें ठिकाण धार येथें कायम केलें. अशा रीतीनें इ. स. १४०१ पासून माळव्याचा स्वतंत्र सुलतान म्हणून दिलावरखान घोरी याचा अम्मल सुरू झाला.

## दिलावरखान घोरी (इ. स. १४०१–१४०५)

याचे कारकिर्दींत गुजराथचे सुलतानाशीं बऱ्याच कटकटी झाल्या. गुजराथेंत मुजफ्फर शहानें पूर्वींच स्वातंत्र्य धारण केलें असून दिलावरखानानें महमूद शहास आपले मर्जीविरुद्ध आश्रयास ठेविलें होतें म्हणून दिलावरखानास जिंकून माळवा गुजराथेस जोडावा असें त्याचे मनांत फार होतें. परंतु त्याचा हेतु सिद्धीस गेला नाहीं.

दिलावरखान स्वतंत्र झाल्यावर फार दिवस वांचला नाहीं. त्याचे राजधानीचें मुख्य ठिकाण धार होतें. तरी तो कधीं कधीं मांडवासही जाऊन राहत असे. अखेरीस इ. स. १४०५ त त्याचा मुलगा अलफखान यानें राज्यलोभानें त्यास विष घालून मारलें.

याचे कारकिर्दींत धार व मांडव येथें कांहीं इमारती बांधल्या गेल्या. धार येथें शहरा बाहेर दक्षिणचे बाजूस हल्लीं "लाट मस्जीद" नांवाची इमारत आहे ती दिलावरखानाचे वेळींच बांधविली गेली आहे. या मस्जीदीचें मुळचें नांव जामी मस्जीद असून ती इ. स. १४०५ त बांधून पुरी झाली. तिजजवळ हल्लीं एक लोखंडी लाट पडली आहे तीवरूनच तिला हल्लींचें "लाट मस्जीद" हें नांव मिळालें आहे.

शहराबाहेर उत्तरेस एक मोठा किल्ला आहे तो बांधण्याचें काम महम्मद तुघलख यानें इ. स. १३४४ त सुरू केल्याचें वर आलेंच आहे हें काम यावेळीं अपूरेंच राहिलें असून पुढें दिलावरखानाचे कारकिर्दींतच पुरें झालें असें म्हणतात. याच किल्ल्यावरून धारशहर "किल्ले धार" या नांवानें प्रसिद्ध आहे.

हल्लीं धार व मांडवगड यांचे मध्यें धारेपासून सुमारें ५।६ मैलांवर दिलावरा म्हणून एक गांव आहे तो दिलावरखानानेंच वसविला असून या ठिकाणीं त्या कालच्या जुन्या इमारतींचे पुष्कळ अवशेष अद्यापही दृष्टीस पडतात. यावरून हा गांव पूर्वीं बऱ्याच भरभराटींत असावा असें अनुमान होतें. धारेहून मांडवास जाण्याचा जुना रस्ता याच गांवावरून जात असून या रस्त्यानें धारेपासून थेट मांडवा पर्यंत जुन्या इमारतींचे अवशेष, लहान मोठे तलाव, विहिरी वगैरे ठिकठिकाणीं दृष्टीस पडतात.

## सुलतान हुसंगशहा घोरी ( इ, स. १४०५।१४३४ )

दिलावरखानानंतर त्याचा वडील मुलगा अलफखान यानें हुसंगशहा हें नांव धारण करून तख्तावर बसला. दिलावरखानाचे वेळींच हा मांडवास जाऊन राहिला होता, व तेथें त्यानें किल्ल्याची डागडुगी वगैरे करून तो किल्ला मजबूत करविला. हा किल्ला चांगला मजबूत असून स्वतःचे इच्छेनें त्याची डागडुगी करविली गेली असल्यानें साहजीकच त्या ठिकाणावर हुसंगशहाचें अधिक प्रेम होतें, व यामुळें दिलावरखानास विषप्रयोग करून मारल्यावर हुसंगशहानें लागलेंच आपलें तख्त मांडवगडास नेलें.

या वेळेपासून मांडव, हें राजधानीचें ठिकाण झाल्यानें पुढें साहजीकच धारचें महत्व कमी पडलें. व मांडवचें वाढलें.

हुसंगशाहा तख्तावर बसला नाहीं तोंच तंट्याबखेड्यास सुरवात झाली. यानें आपल्या बापास राज्यलोभामुळें विष घालून मारलें हें कित्येक सरदारांस आवडलें नाहीं. यामुळें ते याचे विरुद्ध होऊन गुजराथचा सुलतान मुजफ्फरशहा यास मिळाले. मुजफ्फरशहानें मांडवगडावर चाल करून हुसंगशहास राज्यावरून काढून टाकिलें, व तो प्रांत आपला भाऊ नुस्रतखान याचे स्वाधीन केला. नुस्रतखान हा उतावळ्या स्वभावाचा व जुलमी असल्यानें त्याचा अम्मल लोकांस आवडला नाहीं. शिवाय या वेळीं खजीन्यांत पैशाची तूट आल्यामुळें त्यानें प्रजेपासून सक्तीनें पैसा वसूल केला. यामुळें तर राज्यांतील लोकांनीं त्याचे विरुद्ध बंड केलें तेव्हां त्यानें राज्य सोडून पळ काढिला. अशा रीतीनें नुस्रतखानानें राज्य सोडून दिल्यामुळें साहजीकच हुसंगशहास पुनः आपला

---

१ मांडवगड धारचे दाक्षिण दिशेस सुमारें २२ मैलांवर आहे.

अम्मल हळू हळू कायम करतां आला. त्यानें मुजफ्फर शहाशीं स्नेह करून मोठ्या युक्तीनें आपलें गेलेलें राज्य परत मिळविलें. ( इ. स. १४०८ )

पुढें गुजराथचा मुजफ्फरशहा इ. स. १४१० त वारल्यामुळें तेथील राज्यांत तंटे उपस्थित झाले होते, तेव्हां सूड उगविण्यास ही संधी चांगली आहे असें पाहून हुसंगशहानें गुजराथेवर इ. सन १४१८ त स्वारी केली, परंतु तींत त्यास यश आलें नाहीं. तेव्हां त्यानें आपला मोर्चा दक्षिणेकडेस वळविला. प्रथमतः इ. स. १४२० चे सुमारास त्यानें मध्यप्रांतांतील बैतुलजवळील खेरल्याचे राज्यावर स्वारी करून तेथील राजापासून खंडणी घेण्याचें ठरवून तो परत आपले मुलुखांत आला. खेरल्याचा राजा हा महाराष्ट्रांतील बहामनी सुलतान अहम्मदशहा याचा मांडलीक असल्यानें या वेळेपासून हुसंगशहाच्या अहम्मदशहाशींही कट-कटी होण्यास सुरवात झाली. इ. सन १४२८ त अहम्मदशहानें हुसंगशहाचा अगदीं पराभव केल्यामुळें हुसंगशहानें दक्षिणेकडील स्वारीचा नाद सोडून दिला. व उत्तरेकडील मुलुखावर आपले हल्ले सुरू केले. इ. स. १४३१ त त्यानें काल्पी शहर कांबीज केलें. व तेथील किल्ला आपले ताब्यांत घेतला.

यापुढें त्याचे घरांतच तंटे उपस्थित झाल्यामुळें कांहीं दिवस तो हुसंगाबाद येथें जाऊन राहिला होता. व तेथेंच राज्यव्यवस्थेचे काळजींतच त्याचा इ. स. १४३२ त अंत झाला.

याचें थडगें मांडव येथें असून त्यावर पुढें चांगली इमारत बांधविली गेली. ही इमारत हल्लीं चर्वा मस्जीद या नांवानें प्रसिद्ध आहे.

मांडव येथील किल्ला हुसंगशहानें उत्कृष्ट रीतीनें बांधून मजबूत केला होता. त्या काळीं मांडवगडाइतके मजबूत व विस्तीर्ण किल्ले फार थोडे असल्यानें त्याचें महत्व विशेष होतें. हुसंगशहानें मांडव येथें कांहीं इमारतीही बांधविल्या होत्या त्यापैकीं जुम्मा ( जामे ) मस्जीद ही फारच प्रेक्षणीय आहे.

हल्लीं मध्यप्रांतांत असलेलें हुसंगाबाद शहर याचें पूर्वीचें नांव भोजकट होतें, हें पूर्वीं लिहिलेंच आहे. त्या शहराचें हें नांव बदलून हुसंगशहानें त्या शहरास हुषंगाबाद हे नांव दिलें. तसेंच यानें भोजराजानें बांधलेल्या भोपाळ जवळील प्रचंड तलावाचा बांध फोडून टाकला हेंही मागील भागांत आलेंच आहे.

हुसंगशहास शत्रूपासून आपला बचाव करतां आला नाहीं. तथापि राज्यांत पुढें पुढें त्यानें बरीच लोकप्रियता संपादन केली होती.

## गज्नीखान ऊर्फ सुलतान महम्मद घोरी ( इ स १४३२–१४३५ )

हुसंगशहाचे पश्चात् त्याचा मुलगा गज्नीखान यानें सुलतान महम्मद घोरी हें नांव धारण करून तख्तनशीन झाला. हुसंगशहाचे वेळेपासूनच वजीरातीचें काम मलीक मुघीज याजकडेस होतें. व सर्व कारभार त्यानें आपला मुलगा महमूद याचे सल्ल्यानें चालविला होता. त्याकाळीं या उभयतां पितापुत्रांचे राज्यांत फारच वजन होतें, यामुळें हुसंगशहा वारल्यावर तर या दोघांचें महत्व विशेषच वाढलें. वजीरातीचें काम तर आपले कडेस आहेच तथापि माळव्याचे स्वतंत्र सुलतानच आपण व्हावें असें महमूद यास वाटूं लागून त्याप्रमाणें त्याचे प्रयत्नही सुरू झाले. गज्नीखान हा अगोदरच राजकारणांत अगदीं निर्बल होता, शिवाय त्यास पुढें दारूचें व्यसन लागून तो नशांत नेहमी गर्क राहूं लागला; यामुळें तर या पितापुत्रांचें आयतेंच काम झालें. गज्नीखानाचें दारूचें व्यसन वाढल्याप्रमाणावर असल्यानें त्याचे नोकराचे साह्यानें त्यास एके दिवशीं दारूचे ऐवजीं विष देण्याची व्यवस्था महमूद यानें करविली, व सुलतानास ठार मारून इ. स. १४३५ त महमूद यानें मांडव येथील गादी बळकाविली. हा खिलजी वंशांतील होता. तो हुषंगशहाचा जांवई असल्यानें त्यास आपले बायकोकडूनही राज्यावर हक्क दाखवितां येत होता. कारण मुसलमानी धर्माप्रमाणें मुलीही वारस होऊं शकत. यानें अशा रीतीनें घोरी वंशाची वासलात लावल्यावर मांडव येथें खिलजी वंशाचा अम्मल सुरू केला.

## सुलतान महमूद खिलजी ( इ. स. १४३५–१४६९ )

सुलतान महमूद यानें लागलींच संप्रदायाप्रमाणें राजचिन्हें धारण केलीं व तख्तनशीन झाला. राज्य मिळविण्याचे कामीं ज्यांनीं ज्यांनीं सहाय्य केलें त्यांस जहागिरी इनामें वगैरे देऊन संतुष्ट केलें. कांहीं निवडक लोकांस मानाच्या पदव्या देऊन महत्वाचीं कामें त्यांजकडेस सोंपविलीं. आपल्या नांवाचें नाणें पाडून राज्यांत सुरू केलें. हा स्वतः चांगला शूर असून फार चतुर व राजकारण कुशल होता. शत्रूशीं झगडत असतां त्यानें राज्यांतील अंतर्व्यवस्थेची हेळसांड होऊं दिली नाहीं. यानें गुजराथेवर स्वारीकरून तेथील त्यावेळचा सुलतान कुतुब्शहा याचा पराभव केला. पुढें उभयतांत तह होऊन दोघांनीं मिळून मुसलमानी धर्म वाढविण्याची खटपट चालविली, परंतु हा या उभय सुलतानांचा बेत मेवाडचा राणा कुंभ व दुसरे कित्येक रजपूत राजे यांनीं सिद्धीस जाऊं दिला नाहीं.

चितोडचा प्रसिद्ध राणा कुंभ याच्याशीं महमुदाच्या पुष्कळ चकमकी झाल्या. इ. स. १४४० त या उभयतांचें मोठें घनघोर युद्ध होऊन त्यांत कुंभराण्यानें महमुदास जिंकून कैद करून नेलें, * परन्तु पुढें ६ महिन्यांनीं राण्यास कांहीं खंडणी वगैरे देण्याचें कबूल करून त्यानें आपली सुटका करून घेतली. कैदेंतून सुटल्यावर सूड उगविण्याचे इराद्यानें महमुदानें बरेच वेळां चितोड गडावर हल्ले करून राण्यास पुष्कळ त्रास दिला परंतु त्यापासून कांहीं विशेषसा उपयोग झाला नाहीं. सभोंवारच्या रजपूत राजांशीं त्याचे झगडे चालले होते, त्यानें कुंभराण्यावर हल्ले करून जे लहान सहान जय मिळविले होते, त्याचे स्मरणार्थ त्यानें मांडव येथें एक सुंदर फतेमीनार बांधविला होता.* इ. स. १४५१ त त्यानें गुजराथेवर स्वारी केली. तींतही त्यास यश आलें नाहीं.

पुढें इ. स. १४५५ त यानें केरवली, अजमेर व रणथं भोर येथील राज्येंही हस्तगत केलीं. एकदा यानें महाराष्ट्रांतही स्वारी करून बहामनी सुलतानाचा प्रत्यक्ष बेदर राजधानींत पराजय केला. व वऱ्हाडांत असलेला इलिचपूर परगणा घेऊन तो परत आला.

हा इ. स. १४६९ त मांडव येथें मरण पावला. यानें ३४ वर्षें राज्य केलें. मरण समयीं त्याचें वय ६८।६९ वर्षांचें होतें. त्यावेळच्या मुसलमानी सुलतानांत त्याचें वजन फार होतें. इराणचा सुलतान देखील त्याजकडे वकील व नजराणे पाठवी.

याचें बहुतेक आयुष्य लढाया व झगडे करून मुलूख मिळविण्यांतच गेलें, तथापि यानें आपले राज्यांतील प्रजेस त्रास दिला नाहीं. तो परराज्यांत स्वाऱ्या करी तेव्हां मात्र त्यांस त्रास पोंचत असे. यानें प्रजेचे हिताकडे लक्ष्य देऊन लोकहिताचीं कामें करण्यांतही बरेंच लक्ष्य घातलें होतें. यानें हिंदु व मुसलमान दोन्ही प्रजेस सारखेपणानें वागविण्याची व्यवस्था ठेविली होती. विद्यावृद्धीकडेसही याचें चांगलेंच लक्ष्य होतें. मांडव येथें त्यावेळीं यानें एक मदरसा स्थापन केला असून त्यांत चांगल्या शिक्षकांची योजना केली होती. व विद्यार्थ्यांस त्यांचे गुणाप्रमाणें योग्य उत्तेजन मिळण्याचीही व्यवस्था करून ठेविली होती. हल्लीं

* कुंभराण्यानें चितोड येथें किल्ल्यावर जो एक मोठा "विजयस्तंभ" बांधून ठेविला आहे तो याच जयाचें स्मारक आहे.

* हल्लीं ही इमारत अगदीं पडून गेली आहे.

मांडव येथें एक इमारत पडक्या स्थितींत असून ती मदरसा या नांवानें प्रसिद्ध आहे. ती याचेच वेळची असावी असें अनुमान होतें.

याचे कारकिर्दींतही मांडव येथें बऱ्याच इमारती बांधविल्या गेल्या. हुशंगशहानें सुरू केलेली मस्जीद यानेंच पुर्ण केली असून नालछा येथेंही याचे वेळीं कांहीं इमारती बांधल्या गेल्या होत्या.

धार येथें असलेल्या कमाल मौला नांवाच्या इमारतीस हल्लीं नवीन दिसणारा पुढील भाग याचेच वेळीं जोडला गेला आहे. तसेंच धार शहराचे दक्षिणेस अबदुल्लाशहा नांवाचे फकीराची जी कबर आहे तिचा जीर्णोद्धारही यानेंच केला आहे.

## सुलतान ग्यासुद्दीन खिलजी ( इ. स. १४६९–१५०१ )

महमुदा नंतर त्याचा मुलगा ग्यासुद्दीन हा तख्तावर बसला. हा आपले बापाचे कारकिर्दींत नेहमीं मोहिमा वगैरे वरच राहिल्यानें याचे आयुष्याचे पहिले दिवस बहुतेक संकटांत गेले होते. यामुळें राज्य मिळाल्यावर साहजीकच त्याची प्रवृत्ती ऐषआरामाकडेस विशेष झाली; तथापि बापाचे हाताखालीं हरएक कामांत तो तरबेज झाला असल्यानें राज्यकारभारा संबंधानें त्यानें आपलें बिलकुल दुर्लक्ष होऊं दिलें नाहीं. यानें आपला मुलगा नासिरुद्दीन यास युवराज करून त्याजकडेसच मुख्य वजीरातीचें काम सोपविलें होतें व राज्याचा सर्व कारभार त्याचे हुकुमानें चालविण्याची व्यवस्था केली होती. तथापि एकंदर राज्यव्यवस्थेवर त्याचें स्वताचें चांगलेंच लक्ष असल्यानें राज्यांत कोणतीही गैरव्यवस्था न होतां बरीच शांतता राहून दंगे धोपे व लूट माऱ्या वगैरे प्रकार फारसे झाले नाहींत. यामुळें याचे कारकीर्दींत प्रजेस बरेंच सुख लाभलें. मुसलमानांवर प्रीति व हिंदूवर अप्रीति हा प्रकार त्याचे वेळीं कमी होऊन कांहीं जैन हिंदू मोठाल्या अधिकारावर चढले. संस्कृत शिलालेखांत त्याची प्रशंसा केलेली आढळते. हा इ. स. १५०१ चे सुमारास मरण पावला किंवा मारला गेला. कारण, त्यास त्याचा मुलगा नासिरूद्दीन यानें विष घालून मारलें अशी दृढ समजूत आहे.

## सुलतान नासिरूद्दीन ( १५०१–१५११ )

ग्यासुद्दीन वारल्यावर त्याचे मुलांत राज्याविषयीं तंटे उपस्थित झाले होते. तथापि अखेरीस नासिरूद्दीन यानेंच गादी मिळविली. यानें एकदा चितोडगडावर स्वारी करून तेथील राजाचा पराभव केला होता. हा फार निर्दयी व क्रूर असून

दुर्व्यसनी व विषयासक्त असल्यानें याचे विषयीं फार दुर्लौकिक होऊन गेला होता. शिवाय बापास मारण्यासारखें भयंकर व निंद्यास्पद कृत्य केल्यामुळें तर लोकांचें मत याचे विषयीं फारच वाईट झालें होतें. हा दारू पिऊन अगदीं धुंद राहत असे. धारेजवळ साद्लपूर येथें बागेडीनदींत व उज्जयिनी येथें शिप्रा नदींत त्यानें जलप्रासाद थंडाव्या करितां बनविले होते. शेवटीं यमुनेंतील कालियासर्पा-प्रमाणें शिप्रेंतील कालिया डोहांत दारूचे नशांत धुंद असतां पडून त्याचा अंत झाला. ( इ. स. १५११ ) *

**सुलतान महमूद खिलजी २ रा.** ( सन १५११-१५३१ ) नासिरू-द्दीन नंतर त्याचा दुसरा मुलगा अजम हुमायुन हा महमूद खिलजी हें नाव धारण करून गादीवर बसला. यावेळींही गादीविषयीं तंटे उपस्थित झालेच होते. शेवटीं याला मोठ्या प्रयासानें गादी मिळाली. राज्य केवळ तरवारीचे जोरा-वर चालवितां येतें. अशी याची अनेक मुसलमान सरदारांप्रमाणें ठाम समजूत झाली असून ती प्रमाणेंच त्याचे प्रयत्न चालले होते; परंतु अखेरीस या गैरसमजु-तीचे दुष्परिणाम त्यास लवकरच भोगावें लागले. याचा आपले लोकांवर विश्वास नसल्यामुळें त्यानें जुने मुसलमानी कामगार काढून टाकून त्या ऐवजीं दुसरे हिंदु कामगार ठेविले. याला गादी मिळवून देण्याचे कामीं मेदिनीराय नावाचे रजपुताची चांगली मदत राहिली; आणि म्हणून त्यानें मुख्य वजीरातीचें काम मेदिनीराय याजकडेसच सोंपविलें. परंतु पुढें मेदिनीरायावरही कांहीं कारणानें गैरविश्वास होऊन त्यास घालविण्यासाठीं सुलतानानें गुजराथेच्या मुजफ्फर शहाचें सहाय्य मागितलें. मुजफ्फरशहानें येऊन मेदिनीरायाचे सर्व लोकांस हांकून देऊन मांडवगड स्वाधीन करून घेतला. इकडे मेदिनीराय पळून जाऊन चितोड येथील संगराण्याचे आश्रयास जाऊन राहिला व तेथून संग ( संग्रामसिंह ) राण्याचे सहाय्यानें त्यानें मांडवगडावर चाल केली. या स्वारींत रजपुतांनीं सुलतानास जेर करून घायाळ झाला असतां जिवंत पकडलें व कैद करून नेलें. संगराण्यानें मोठ्या काळजीनें सुलतान महमुदाच्या सर्व जखमा बऱ्या केल्या आणि इतमामासह त्यास उदारबुद्धीनें मांडवास पोचतें केलें वस्तुस्थिती अशा

---

* याची कबर मांडव येथें करण्यांत आली होती परंतु दिल्लीचा जहांगीर बादशहा इ. स. १६१६ त मांडवास आला होता त्यावेळीं त्यानें त्याची ही दुष्कीर्ति ऐकून त्याचें धडगें उकरवून नर्मदेंत फेंकून दिलें असल्याचें समजतें.

प्रकारची असतांही पुढें संगराणा वारल्यावर कृतघ्न महमूदशहानें चितोडचे गादी विरुद्ध उठण्यास कमी केलें नाहीं.* पुढें गुजराथचा सुलतान मुजफ्फरशहा ( दुसरा ) इ. स. १५२६ त वारल्यावर बहादुरशहाच्या विरुद्ध ज्या खटपटी झाल्या त्यांतही महमूदशहाचें अंग होतें. म्हणून बहादुरशहानें मांडवगडावर स्वारी करून महमूदशहास मुलांलेकरांसह कैद करून नेलें व मांडवचें राज्य काबीज करून आपले राज्यास जोडलें. + पुढें कैदेंतून पळून जाण्याविषयींचे महमुद याचे प्रयत्न चालले होते, ते बहादुरशहाचे लक्षांत आल्यावरून त्यास दोहद मुकामीं ठार मारण्यांत आलें ( इ. स १५२६ ) या वेळेसपासूनच मांडवच्या स्वतंत्र मुसलमानी राज्याची परिसमाप्ति झाली.

परमारराजा यशोवर्मदेव याचे कारकीर्दींत सुमारें चारशें वर्षांपूर्वीं अशाच रीतीनें हे माळव्यांतील परमारांचे राज्य त्यावेळचे गुजराथी चौलुक्य वंशीय राजांनीं काबीज करून घेतलें होतें त्याच गोष्टीची ही पुनरावृत्ती मुसलमानांचे वेळींही झाली ही विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

याप्रमाणें हे मांडवचें ( माळव्याचे ) राज्य बहादुरशहाकडेस गेल्यावर त्यानें थोडीं वर्षेंच कायतो माळव्यावर अधिकार गाजविला इ. स. १५३५ त दिल्लीचा मोगलबादशहा हुमायून यानें स्वारी करून बहादुरशहास हांकून लाविलें परंतु हुमायून माळव्यांतून गेला नाहीं तोंच चंदेरी प्रांतांतील जहागिरदार मालूखान कादिर यानें माळव्यावर हल्ला करून तेथें आपला अम्मल बसविला. पुढें दिलीस सूरजातीच्या शेरखान नामक अफगाणाचें बंड होऊन दिल्लीची पादशाहत त्याजकडेस गेली. इ. स. १५४३ त शेर शहानें माळव्यावर स्वारी केली व तो प्रांत पुनः आपले ताब्यांत घेतला व त्यावर आपले भरंवशाचा सरदार सुजावलखान × यास सुभेदार नेमलें. यानें सुमारें १० वर्षें माळव्यावर आपला अधिकार गाजविला. याची कारकिर्द रयतेस बरीच सुखकारक होती, असें म्हणतात. मुसलमानांचे वहिवाटीप्रमाणें स्वतंत्रता धारण करण्याचा याचाही इरादा होता परंतु पुढें तो लवकरच इ. स. १५५४ त मरण पावल्यामुळें त्याचा तो बेत जागच्याजागींच

---

* उपकाराची अपकारानें फेड केली अशीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आढळतात.

+ याच वेळीं धारची लोहमय लाट गुजराथेंत नेण्याचा प्रयत्न झाला व लाटेचीं शकलें झालीं.

× टीपः—हल्लीं शिंदे शाहींत असलेला ' सुजालपूर ' हा गांव यानेंच वसविलेला आहे.

राहिला. तथापि त्याचे मागें त्याचा मुलगा बाज बहादुर यानें लागलींच आपण स्वतंत्र सुलतान झाल्याचें जाहीर केलें व मांडव येथें राहून राज्याची सर्व व्यवस्था लाविली. प्रथमतः राज्यांतील गडबडी नाहींशा करून कांहीं नवीन मुलूखही मिळविण्याचे प्रयत्न केले, परंतु त्यांत त्यास फारसें यश आलें नाहीं. यानें मांडव येथें इ. स. १५५४ पासून १५६४ पर्यंत सुमारें १० वर्षें राज्य केलें. हा बादशहा फार विलासी, मृगयाकुशल व संगीतलोलूप होता. याची रूपमति नांवाची राणीही अप्रतिम सुंदर असून संगीत शास्त्रांत फार प्रविण व चतुर होती. ही कोणा रजपूत ठाकुराची कन्या असून तिचें गानमाधुर्य व लावण्यकांती पाहून बादशहा बाजबहादुर हा तिचेविषयीं फारच प्रेमानुरक्त झाला व त्यानें तिला आपलेबरोबर लग्न लावून आपली पट्ट-राणी होण्याविषयींची इच्छा प्रदर्शित केली. रूपमतीनेंही बादशहाचें निस्सीम प्रेम पाहून त्याशीं विवाह केला. अशा रीतीनें उभयतांचा हा प्रेमसंबंध ( इ. स. १५५७ चे सुमारास ) घडून आल्यावर बादशहा नेहमी त्याच रंगात दंग राहूं लागला. व त्यामुळें पुढें राज्यव्यवस्थेंत त्याचें फारच दुर्लक्ष राहिलें. इकडे दिल्लीयेथील बादशहा अकबर यानें बाजबहादुर हा ऐषआरामांत गाफिल आहे अशी संधी पाहून माळव्यावर स्वारी करून मांडवचें राज्य काबीज केलें. बाजबहादूर पळून गेला, व रूपमती ही अकबराचा सेनापति आदमखान याचें हातीं लागली. तिचें सौंदर्य पाहून तो तिजवर फार लुब्ध झाला व तिला वश करण्याचे त्यानें पुष्कळ प्रयत्न केले. परंतु ती फार पतिनिष्ठ असल्यानें तिनें विष प्राशन करून प्राणत्याग केला. *

बाजबहादुर यानें मांडव, सारंगपुर वगैरे ठिकाणीं इमारती बांधलेल्या अद्याप भग्न स्थितींत विद्यमान आहेत.

अशा रीतीनें मांडवचें राज्य मोंगलांचे ताब्यांत गेलें तें पुढें सुमारें १६० वर्षे त्यांचे कडेसच होतें. अकबरानें माळवा प्रांत हातीं आल्यावर त्याची योग्य व्यवस्था लाविली. त्या वेळीं माळवा हा एक सुभा असून त्या सुभ्यांतील मांडव सरकार पैकीं धार हें महालाचें मुख्य ठिकाण होतें. दिल्लीदरबाराकडून माळ-व्यावर योग्य सुभा नेमला जाऊन त्याजकडून सर्व अधिकार चालविला जात होता ही स्थिती या प्रांतावर पुढें मराठेशाही होईपर्यंत कायम होती. इ. सन

* रूपमतीचें विस्तृत वृत्त मांडव येथील स्थलवर्णनांत आलें आहे.

१७२५ त बाजीराव पेशवे यांनीं पदरीं असलेल्या सरदारांस माळवा प्रांतावर चौथ व सरदेशमुखी हक्क वसूल करण्यासाठीं पाठविलें. अखेरीस इ. स. १७३१ त मांळवा प्रांत पेशव्यांनीं काबीज करून मराठी राज्यास जोडिला अशा रीतीनें या प्रांतांतील मुसलमानी अंमलाचा शेवट झाला.

असो; आतां या माळव्यांतील मुसलमानी आमदानीचें थोडें पर्यालोचन करूं.

मुसलमानांनीं आपले नेहमींचे वहिवाटीप्रमाणें प्रथमतः या प्रातांत लुट-माऱ्या करणें, मुलुख उध्वस्त करणें, हिंदु व जैन देवालयांचा उच्छेद व विध्वंस करणें, वगैरे प्रकार सुरू केले. अशी स्थिती सुमारें १०० वर्षें राहिली. पुढें धार येथें मुसलमानांची स्वतंत्र गादी स्थापन होऊन कांहीं दिवसांनीं गादीचें मुख्य ठिकाण मांडव हें झालें. मांडवास गादी गेल्यावर इ. स. १५३१ पर्यंत तेथें मुसलमानांचा बहुतांशी स्वतंत्र अम्मल राहिला. या अवधींत या प्रांताची सत्ता सुमारें ३४–३५ वर्षें घोरी घराण्याकडेस राहिली व पुढें खिलजी घराण्यानें सुमारें ९५ वर्षें राज्य केलें, या स्वतंत्र राजसत्तेच्या कालांत राज्यास शत्रूचा उपद्रव विशेष असून गृहकलहामुळें राज्यांत शांतता राहिली नाहीं.

या दोन्ही मुसलमानी राजघराण्याच्या कारकीर्दी पाहतां:—

( १ ) धन्याचे सत्तेस धाब्यावर बसवून स्वतंत्रता धारण करून राज्य बळकाविणें,

( २ ) सुलतानाचे मुलांनीं राज्यलोभानें प्रत्यक्ष बापावर उठून त्यास मारून अगर पदच्युत करून राज्यापहार करणें,

( ३ ) सुलतानाचे मरण समयीं राज्यांत बळी तो कान पिळी असा प्रकार होऊन राज्यांत बंडाळी माजणें, व

( ४ ) राज्यपद प्राप्ति झाल्यावर राजकुटुंबांतील विरुद्धपक्षीय पुरुषांशीं व स्त्रियांशीं अत्यंत क्रूरतेनें वागून त्यांस कैदेंत टाकणें, शिरच्छेद करणें इत्यादि आसुरी प्रकाराचें प्राबल्य होतें.

प्रत्यक्ष राजकर्त्यासंबंधानें वरील प्रकारची स्थिती असून त्यांचे स्वभावावर व लहरीवर प्रजेचें सर्वस्वी सुख दुःख अवलंबून असल्यामुळें राज्यव्यवस्था ह्या क्षणीं सुखावह तर त्या क्षणीं दुःसह होऊन जाई. यामुळें राज्यांत नेहमीं अस्वस्थता राहून प्रजेस आबादानी व सुख लाभलें नाहीं. प्रजेस शाश्वती व

सुरक्षितपणा फारच अल्प प्रमाणावर वाटत असे. नेहमीं राज्यांत तंटेबखेडे होत असल्यानें शेतकऱ्यांस पूर्णपणें पिकें हातीं पडतील असा भरंवसा नव्हता. यामुळें व्यापारधंद्यासही उत्तेजन मिळत नसे. प्रजेचें जीवित, माल-मत्ता, व स्वातंत्र्य केवळ राजाचे लहरीवर अवलंबून असे. शिवाय धर्म समजुतीमुळेंही प्रजेस मुसलमानी आमदानींत बराच त्रास सोसावा लागला. हिंदु व जैन देवालयांचा व मंदिरांचा या कालांत उच्छेद होऊन परमारांचे वेळच्या संस्कृत वाङ्मयाचा बहुतेक नायनाट त्या कालींच झाला. कित्येक हिंदु देवालयें नष्ट व भ्रष्ट करण्यांत आलीं. अशा प्रकारें त्या काळीं राज्यांत फारच अस्वस्थता राहिली.

तथापि अशा स्थितींतही महमूद खिरुजीचे वेळीं राज्यांत पाठशाळा वगैरे स्थापन होऊन लोकशिक्षणाचे प्रयत्नही झाले होते. शिवाय यावेळीं मांडव व धार येथें कलाकौशल्यासही बरेंच उत्तेजन मिळत असे. हें त्यावेळीं मांडव येथें ज्या पुष्कळशा सुंदर इमारती बांधल्या गेल्या त्यावरून व्यक्त होतें.

असो याप्रमाणें माळव्यांतील या मुसलमानी सत्तेची थोडक्यांत हकीगत आहे. या नंतर या प्रांतावर मराठ्यांचा अम्मल सुरू होऊन पुढें धारानगरीचें स्वामित्व हल्लींच्या पवारघराण्याकडेस आलें याबद्दल सविस्तर हकीगत पुढील भागांत येईल.

# धार व मांडव येथील ऐतिहासिक
# व
# प्रेक्षणीय स्थलांचें वर्णन.



## धार येथील प्रेक्षणीय स्थलें.



**धारः**—हें श्रीमंत पवार सरकारच्या राजधानीचें शहर, मध्य हिंदुस्थानांत इंदूरचे पश्चिमेस १८ कोसांवर आहे; व राजपुताना माळवा रेलवेच्या महू स्टेशनपासून ३३ मैलांवर आहे. महूहून धारेस येण्यास हल्लीं ग्वालियर स्टेट मोटार सर्व्हिस आहे. मोटारचें भाडें माणशीं दोन रुपये दोन आणे पडतें याशिवाय टांगेही मिळतात.

या शहराचें प्राचीन नांव ' धारानगरी. ' ही प्रसिद्ध मालवचक्रवर्ति भोजदेव याची राजधानी होती.

महूचे रस्त्यानें धारेस येतांना प्रथमतः धारशहराचे ईशान्येस असलेला भव्य व सुंदर

### किल्ला

सहज येणारे लोकांचे नजरेस पडतो. हा किल्ला लहानशा टेकडीवर असून चांगल्या सफाईदार लाल दगडांनीं बांधलेला आहे. हा दिल्लीचा सुलतान महम्मद तुघलक यानें बांधविला. महम्मद तुघलक हा इ. स. १३४४ त महाराष्ट्रांत देवगिरी उर्फ दौलताबादचे जाधवांवर चालून जात असतां कांहीं दिवस धारेस राहिला होता; त्यावेळेस त्यानें बांधविला. याबद्दलचा उल्लेख जहांगीर बादशहाचे डायरींत आला आहे. दक्षिणचा सुभेदार कतलघखान यानें देवगिरीस वसूल केलेली खंडणीची रकम, रस्त्यांतील गडबडीमुळें दिल्लीस पोचविली जाईना म्हणून, त्यावेळचा माळव्याचा सुभेदार अजीज हिमार याचे ताब्यांत धारचे किल्यांत ठेविली होती. पुढें दिल्लीचा बादशहा शहाजहान याचे चार पुत्रांत राज्याविषयीं तंटे उपस्थित झाले, त्यावेळीं इ. स. १६५८ त दाराशे-

खोचे सैन्यानें धारचे किल्ल्याचा आश्रय केला होता, परंतु पुढें औरंगजेब आल्यावर दाराचे लोक किल्ला रिकामा टाकून जसवंतसिंगास जाऊन मिळाले. यापुढें धारचा किल्ला मोंगलांचे ताब्यांतून कायमचा[१] इ. स. १७३१ त हल्लींच्या पवार घराण्याकडे आला. त्यानंतरच्या कालांत हा किल्ला ऐतिहासिकदृष्ट्या दुसरे बाजीराव पेशवे यांची जन्मभूमी म्हणून प्रसिद्ध आहे. श्री. नारायणराव पेशव्यांचा वध झाल्यावर पुणें येथें गडबडी सुरू झाल्या त्यावेळीं रघुनाथराव दादा पेशवे यांनीं तेथून पळ काढला व माळव्यांत येऊन धार येथें किल्ल्यांत त्यावेळचे धार येथील राजे खंडेराव पवार यांचे आश्रयास आपले कुटुंबास ठेविलें होतें, पुढें तेथें आनंदीबाई प्रसूत होऊन बाजीरावाचा जन्म इ. स. १७७६ च्या जानेवारी महिन्यांत बहुधा ता. ११ ला झाला*. किल्यांत ज्या ठिकाणीं आनंदीबाई राहत होती तें ठिकाण 'आनंदी बुरूज' या नांवानें प्रसिद्ध आहे. येथेंच एक लहानशी मुलांची खेळण्याची विहिर बांधलेली आहे ती बाजीरावाचीच आहे असें म्हणतात. इ. स. १८५७ चे बंडाचेवेळीं धारचा किल्ला बंडवाल्या विलायती नकराणी लोकांनीं आपले ताब्यांत घेऊन त्यांत ते घुसून बसले होते. महू येथील जनरलस्टुअर्ट यांच्या पलटणीनें प्रथमतः या किल्ल्यावर हल्ला चढविला. ही तुकडी महूहून १९ आक्टोबर रोजीं निघून २२ आक्टोबरला धारेस आली. शहरापासून एक मैलावर खिंडींत तिनें आपला तळ दिला होता. सुमारें ३०० यार्डावरून तोफांचा एकसारखा मारा चालला तेव्हां ६ वे दिवशीं किल्ल्याचा तट फुटून ता. ३० आक्टोबर रोजीं हें सैन्य मोठ्या जोरानें आंत घुसलें, इतक्यांत बंडवाले दुसऱ्यामार्गानें मंदसोरकडे पळून गेले होते. या वेळीं या किल्ल्यांतील खजिन्यांत ९ लक्ष रुपये निघाले ते महूस पाठविण्यांत आले. यावेळीं तोफांनीं किल्ल्याचा तट फोडला होता, त्याचा कांहीं भाग हल्लीं दुरुस्त केला आहे. या किल्ल्याचे तिसरे दरवाज्यावर लोखंडी

---

* यासंबंधानें धार येथील जुने ग्रामजोशी यांच्या येथील जुने कागदांत दाखले सांपडले ते येणेंप्रमाणें.

**१ द्वितीय मास प्रवेशः**—संवत् १८३२ शके १६९७ माळवी फाल्गुन वद्य पंचमी शुक्रे उदयात् इष्ट घ. १६।४९ समये सूर्य ९।२९।५५।४.

**२ तृतीय मास प्रवेशः**—संवत् १८३२ शके १६९७ माळवी चैत्र वद्य ५ रविवार इष्ट घ. ४।१३ माससूर्य १०।२९.

पऱ्यांवर कोरलेला एक पर्शियन लेख आहे. त्यांत " हा दरवाजा अलमगीर बादशहाचे राज्यास २७ वें वर्ष होतें त्यावेळीं ( इ. स. १६८३ ) त अशीरबेग किल्लेदार यानें बांधला " असा उल्लेख आहे.

या दरवाज्या जवळच ' बंदी छोड ' म्हणून एक कबर आहे. कोणी हजरत मकबुल या शूर शिपायानें आपल्या आईचे आज्ञेवरून किल्ल्यांत कैदेंत असलेल्या लोकांस सोडून दिलें व यामुळें किल्ल्यांतील शिपायांशीं त्याचें युद्ध होऊन त्याचें शिर या दरवाज्याजवळ पडलें. त्याचें धड लढतच होतें, तें पुढें २०० यार्डावर पडलें. यानें बंदिवासांतून लोकांस मुक्त केलें म्हणून त्यास ' बंदी छोड ' असें नांव देऊन या दोन्ही ठिकाणीं त्याच्या कबरा करण्यांत आल्या आहेत, त्यांस एकाद्या साधूच्या किंवा अवलियाच्या कबराप्रमाणें लोक पूज्य मानितात व नवसहि करितात. यानंतर दुसरें स्थल.

## लाट मस्जीद

हें धार शहराचे दक्षिणेस आहे. ही मस्जीद माळव्याचा पहिला सुलतान दिलावरखान घोरी यानें इ. स. १४०५ सालीं बांधिली. प्राचीन हिंदू व जैन इमारतींचा व देवालयांचा विध्वंस करून त्यांचे दगडीखांब वगैरेचा उपयोगही मशीद बांधण्याकडेस केला गेला आहे हें थोडें बारकाईनें पाहिल्यास तेव्हांच कळण्यासारखें आहे. या इमारतीचे खांबांत सारखेपणा कोठेंच नाहीं ठिकठिकाणीं खांबावर व इतर ठिकाणीं असलेल्या मूर्तींची फोडून वासलात लाविलेली दिसते. व आणखीही कित्येक हिंदुपद्धतीच्या खाणाखुणा ठिकठिकाणीं नजरेस पडतात. या मशीदीचें मुसलमानी काळचें नांव जामी मस्जीद असें आहे व दिल्लीचा बादशहा जहांगीर याचे डायरींतही या मशिदीचा जामी मस्जीद या नांवानेंच उल्लेख आला आहे. या मशीदीचे पूर्व व उत्तर बाजूस दोन दरवाजे असून त्यावर दोन पर्शियन शिलालेख कोरलेले आहेत मुख्य दरवाजाचें तोंड पूर्वेस असून त्यावर जो लेख आहे त्यांत " धार शहरांत इस्लामी धर्माचा सहायक अशा दिलावरखानानें हिजरी सन ८०७ ( इ. स. १४०५ ) यावर्षीं ही सुंदर जामी मस्जीद प्रति काबा म्हणून बांधविली " अशा तऱ्हेचा उल्लेख असून उत्तरबाजूचे दरवाजावरचे लेखांत " अमीदशहा दाऊद घोरी ( दिलावर खानाचें पूर्ण नांव ) यानें ही मस्जीद १५ रज्जब सन ८०७ हिजरी ( १७ जानेवारी १४०५ ) या दिवशीं उभारली " असें लिहिलें आहे.

या मशीदीचे बाहेरचे आंगास जवळच एके दगडी चउऱ्याला टेकलेली एक भली थोरली चोवीस फूट लांब व सुमारें चार फूट घेराची चौकोनी लोखंडाची लाट पडलेली आहे. या लाटेवरूनच या मशीदीस हल्लीं 'लाटमशीद' असें म्हणतात. जवळ जवळ ४०० वर्षें ही लाट अशीच पडलेली आहे.* या लाटेवर एके बाजूस एक पार्शियन लेख आहे, त्यांत बादशहा अकबरानें ८ वी इस्फंदार सन जलूस ४४ म्हणजे १००८ हिजरा ( १५ फेब्रुवारी इ. स. १६०० ) या दिवशीं दक्षिणेस जातांना धारेस मुक्काम केल्याचें लिहिलें आहे.

इ. स. १६१६ चे सुमारास बादशहा जहांगीर हा माळव्यांत होता. त्यानें आपले डायरींत लिहिलें आहे कीं, "माझे पाहण्यांत ही लाट अशीच पडलेली आहे. गुजराथचा सुलतान बहादुरशहा यानें माळवा प्रांत हस्तगत केला तेव्हां ही उभी होती. बहादुरशहानें ही लाट येथून काढून अहमदाबादेस नेण्याचा हुकूम केला होता तेव्हां ती काढतांना पडली व तिचे तीन तुकडे झाले." जहांगीर बादशहानेंही ह्या तुकड्यांपैकीं मोठा तुकडा दीपस्तंभ करण्यासाठीं आग्र्यास नेण्याची खटपट करून पाहिली पण ती सफल झाली नाहीं.

अशी ही अजस्र लाट कोणी कशासाठीं व कधीं बनविली याबद्दल माहिती इकडील लोकांस मुळींच नसून ही तेलणीची लाट आहे अशी त्यांची दृढ समजूत होऊन बसली आहे. शिवाय या लाटेविषयीं "कहां राजा भोज और कहां गांगी तेलण*" अशी एक हिंदुस्थानी म्हण सर्वतोमुखीं झालेली ऐकण्यांत येते व तिचें समर्थनही असें केलें जातें कीं भोजराजाचे वेळीं एक फारच मोठी जगड्व्याळ तेलीण होती, ही लाट त्या तेलणीच्या तराजूची दांडी आहे, व तेथें जवळ पडलेल्या ओबडधोबड तीन मोठाल्या शिला आहेत त्या तिचीं वजनें आहेत. धारेचे दक्षिणेस ७ कोसांवर नालछा म्हणून गांव आहे तेथें ती

---

* असा एक लोहस्तंभ दिल्लीस आहे. पण तो वाटोळा आहे.

* ही म्हण फार जुनी असून देशोदेशीं तिचीं रूपांतरें व भाषांतरें झालीं आहेत. सुंदर दासाच्या सुंदर विलासांत "कहां राजा भोज कहां गांगो तेली कहिये" असें रूप आढळतें. बुंदेलखंडांत, "कहां राजा भोज, और कहां टूटा तेली" हें रूप आहे. रेवा काठ्याकडे तीस "कहां मोहोर और कहां अधेली" असा दुसरा चरण मिळाला आहे. गुजराथेंत "क्यां राजा भोजने क्यां गांगली घाचण" ( तेलीण ) तात्पर्य, कोठें तेलीण कोठें तेली असा पाठ असून भोजराजाची तेलविक्याशीं तुलना झाली आहे.

तेलीण राहत असे, व तेथून ती दररोज धारेस तेल विकण्यासाठीं येई. नालछा-गांवाजवळ एक टेकडी आहे तिला तेलण टेकडी म्हणतात ती या तेलणीचे लहंग्यांतल्या धुळीची बनली आहे " या दंतकथेंत महापराक्रमी व विद्वान भोज-राजाची तुलना क्षुद्र तेलणीशीं कां करण्यांत आली याचें स्वारस्य कोणाचे लक्षांत येण्याजोगें नाहीं. परंतु याचा उलगडा नुकताच १५।१६ वर्षांपूर्वीं येथील कमाल मौला नांवाचे इमारतींत अर्जुनवर्म प्रशस्ती म्हणून जो एक शिलालेख सांपडला त्यावरून झाला. त्यांत त्रिपुरी येथील विक्रमादित्य बिरुदधारी चेदिराज **गांगेयदेव** याचा भोज राजानें पूर्ण पराभव केला असा उल्लेख आहे. तसेंच या चेदिवंशीयराजांचे व दक्षिणेंतील हैदराबाद जवळील कल्याणपूरचे चालुक्य राजे यांचें जवळचें नातें होतें.-चालुक्यांशींही परमारांचें भोजदेवाचा चुलता मुंजदेव याचेवेळेपासून वाकडें होतें. मुंजदेवानें अनेक वेळां दक्षिणेवर यशस्वी स्वाऱ्या केल्या, परंतु शेवटचे स्वारींत तो त्यांचे हस्तगत होऊन प्राणास मुकला. पुढें भोजदेवानें लवकरच या चालुक्य राजांचा पराभव करून मुंजदेवाचे वधाबद्दल सूड उगविला. हे चालुक्य राजे तेलंगणांतील असल्यामुळें त्यांस तेलंगण राजे म्हणणें स्वाभाविक आहे.

तात्पर्य भोजदेवानें चेदिराज गांगेयदेव व तेलंगणराज या उभयतां पराक्रमी शत्रूंचें पारिपत्य करून यश मिळविलें, त्याचें स्मरण चिरकाल राहावें याकरितां त्यानें आपले प्रीय नगरींत लोहमय जयस्तंभ उभारला. त्याचें नांव " गांगेय तेलंगणचा स्तंभ (लाट) " असें पडणें अगदीं साहजीक आहे. परंतु पुढें ऐतिहासिक गोष्टींचा विसर पडल्यामुळें ' गांगेय तेलंगणाचे ' ऐवजीं ' गांगी तेलण ' हे शब्द योजले जाऊन हा स्तंभ ' गांगी तेलणकी लाट ' या नांवानें लोकांत प्रसिद्ध झाला. नालछा जवळील टेकडीशींही वरील ऐतिहासिक गोष्टीचाच कांहीं तरी संबंध असला पाहिजे. वरील राजे धारेवर चाल करून आले त्यावेळीं त्यांनीं आपले छावणीचा तळ या टेकडीजवळ दिला असावा, किंवा भोजदेवाचें व त्यांचें जें युद्ध झालें तें या टेकडीजवळ झालें असावें परंतु पुढें कालगतीनें लाटेचा संबंध तेलिणीशीं जोडला गेल्यावर साहजीकच सदरील टेकडी व लाट ज्या दगडांत उभारली होती त्या दगडाचे तुकड्यांचाही संबंध तिजकडेस लाविला जाऊन वरील गोष्ट अस्तित्वांत आली आहे. व इतिहास विस्मृतीमुळें मूळच्या ' कहां राजा भोज और कहां गांगेय तेलंगण ' या म्हणीचें रूपांतर वरील म्हणींत झालें आहे.

यावरून राज्यक्रांती व नष्टस्मृतीमुळें इतिहासाचा लोप होऊन कशा दंतकथा उद्भवतात व ऐतिहासिक पुरावा मिळाला म्हणजे त्यांचा कसा उलगडा होतो हें चांगलें ध्यानांत येईल.

लाट मशीदीवरील गच्चीवर उभें राहिलें असतां नैर्ऋत्यकोनास सुमारें अडीच तीन मैलांचे अंतरावर एक टेकडी दिसते ती **सिंहासन टेंकडी**, या नांवानें प्रसिद्ध आहे. सिंहासनद्वात्रिंशति नामक संस्कृत ग्रंथांत भोज राजाविषयीं जें कथानक दिलें आहे तें या टेकडीवरच घडलें असें म्हणतात. वरील संस्कृत ग्रंथाचें मराठी भाषांतर झालें असून तें सिंहासन बत्तिशी या नांवानें प्रसिद्ध आहे.

यानंतर लाट मशीदीपासून थोड्या अंतरावर धार शहराचे नैर्ऋत्येस

**‘ अबदुल्ला शहा चंगाल ’**

नांवाची दर्गा आहे. जुन्या धूळकोटाचे अवशेष जे हल्लीं ठिकठिकाणीं दृष्टीस पडतात त्या कोटाचे एके टेकड्यावरच सदरहू दर्गा बांधलेली आहे. शहा चंगाल नांवाच्या प्राचीन अवलियाची ही कबर आहे असें म्हणतात व त्याचे जवळच चाळीस पीर म्हणून ४० मुसलमान यात्रेकरूंची येथें कत्तल झाल्याचें स्थल दाखवितात. हा अबदुल्लाशहा कोण होता याबद्दल ठीकशी माहिती मिळत नाहीं तथापि अशी दंतकथा आहे कीं, तो मदीना येथील राहणारा असून माळव्यांत प्रथमतः जे इस्लामी धर्माचे उपदेशक आले त्यापैकींच तो एक होता. परंतु त्या वेळच्या इतिहासांत त्याचा कोठें उल्लेख आलेला दिसत नाहीं.

या मशीदीचा जीर्णोद्धार माळव्याचा सुलतान महमूद खिलजी ( इ. स. १४३५–१४६९ ) यानें हिजरीसन ८५९ ( इ. स. १४५५ ) यावर्षी केला असें या दर्ग्याचे दरवाजावर जो पर्शियन लेख आहे त्यांत लिहिलें आहे. शिवाय या लेखांत “ शहाचंगाल हा मोठा बलशाली वीर इस्लामी धर्माच्या मुख्य ठिकाणाहून मोठ्या सैन्यानिशीं या प्रसिद्ध स्थळीं आला व त्यानें येथील देवतांच्या मूर्तींचा नाशकरून त्यांच्या देवालयांचे व मंदिरांचें रूपांतर या मशीदींत केलें. हें पाहून भोजराजानें शहाणपणानें आपल्या मोठमोठ्या योद्धयानिशीं इस्लामी धर्माची दीक्षा घेतली ” असा चमत्कारिक मजकूर दिला आहे.

या लेखांत भोजराजा संबंधानें जें विधान केलें आहे तें मुळींच संभवनीय दिसत नाहीं. कारण भोजदेवाचे वेळीं ( इ. स. १०१०–१०५५ ) मुसलमा-

° अशी एक सिंहासन टेकडी उज्जयिनी येथें ही दाखविण्यांत येते.

नांचा इतका अम्मल हिंदुस्थानांतच नव्हता. त्यांत माळव्यांत तर मुळींच नव्हता. तेव्हां ही गोष्ट प्रसिद्ध मालवचक्रवर्ती भोजदेवासंबंधानें मुळींच खरी मानतां येत नाहीं. शिवाय या गोष्टीस वरील लेखाशिवाय फारसी तवारिखात कोठें विश्वसनीय आधार नसून हा लेख भोजदेवानंतर सुमारें ४०० वर्षांनीं लिहिला गेला आहे; तेव्हां या लेखांतील विधान कोणीतरी धर्माभिमानबुद्धीनें केलेलें असेलसें दिसतें. किंवा पुढें परमाराचे राज्यावर आणखी एक भोज नांवाचा राजा झाला, ( इ. स. १२८०–१३१० ) त्यावेळीं त्यास कदाचित् तसा कांहीं प्रसंग आला असल्यास नकळे ! अवलीयांचे सेवेस लागल्यामुळेंही असा प्रवाद् उत्पन्न होणें संभवनीय आहे. येथून पुढें जवळच धार शहराचे पश्चिमबाजूस

## भोजशाला व कमालमौला.

ही इमारत आहे. ही भोजकालीन एका प्रसिद्ध इमारतीचें रूपांतर आहे. अद्यापही हिला लोक भोजशाला किंवा "भोजराजाकी निसाल" असें म्हणतात. ही इमारत लाट मशीदीपेक्षां लहान असून तिचे खांब वगैरेंत ही लाट मशीदीप्रमाणेंच सारखेपणा मुळींच नाहीं. व त्यावर ठिकठिकाणीं हिंदुपद्धतीच्या पुष्कळ खाणाखुणा आहेत. परमविख्यात महापण्डित व विद्वत्प्रिय भोज राजानें इ. स. १०१० पासून १०५५ पर्यंत राज्य केलें. त्याचे पदरीं चौदाशें पंडित असून तत्कालीन कालीदास हा त्यांत प्रमुख होता. असें म्हणतात. त्याचे सभेंत दूरदूरचे देशांतून पंडित व कवि येत असत. त्यांस राजाकडून पुष्कळ मोठमोठ्या देणग्या मिळत. यावेळीं भोजराजानें या आपल्या प्रियराजधानींत– धार येथें–मुख्य चतुष्पथांत ( चौकांत ) एक सुंदर व भव्य सरस्वती मंदिर बांधिलें होतें. त्यांत विद्यार्थ्यांस शिकविण्याची सोय केली असून, त्याचे सभामंडपांत पंडितांच्या सभा भरत असत. त्यांत तो स्वतः ही विराजमान होत असे. तेंच सरस्वती मंदिर हल्लीं या मशीदीचे वेषांत आहे. या मंदिराचे आवारांत एक सरस्वती कूप होता. त्याचे जल प्राशनानें बुद्धी तीव्र होत असे. हल्लीं या कूपास 'अक्कल कुई' असें म्हणतात. हें सरस्वती मंदिर मोठें भव्य असून धारा नगरींतील चौऱ्यायशी चौकांतील देवालयांचा तें एक अलंकार होतें. प्रसंग विशेषीं या मंदिराचा नाट्यशाला म्हणजे थियेटरप्रमाणेंही उपयोग होत असे असें यास्थलाचें मोठें बहारीचें वर्णन अर्जुनवर्मप्रशस्तींत केलें आहे. या

प्रशस्तींत या स्थलास 'शारदासदन' किंवा 'भारतीभवन' म्हटलें आहे. या शारदा सदनाच्या भिंती सुवाच्य व तत्कालिन सुंदर बालबोध लिपींत कोरलेल्या अनेक संस्कृत प्राकृत लेखांनीं मंडित होत्या; हल्लींच्या काळांत विद्यालयातून जसे अनेक नकाशे चित्रपट वगैरे लाविलेले असतात तसेच या विद्यालयांतही व्याकरणादि विषयांतील वर्णमाला प्रत्ययमाला वगैरे लेख भिंतीवर व स्तंभावर कोरून ठेविलेले असत; इतकेंच नव्हे तर अनेक ग्रंथचे ग्रंथ मोठमोठ्या टिकाऊ कृष्ण शिलांवर सुंदर अक्षरांनीं कोरून भिंतीस लावून ठेविलेले होते परंतु पुढें कालवशांत परमारांचें राज्य जाऊन मुसलमानी अम्मल झाला तेव्हां दैव दुर्विलासामुळें अशा प्राचीन देवालयांच्या मशीदी झाल्या. त्या वेळीं हे लेख छिन्न विच्छिन्न होऊन फरसबंदीस लाविले गेले. हें पाहून कालचक्राच्या या विचित्र-गतीबद्दल कोणास विस्मय व दुःख होणार नाहीं ! तथापि कर्मधर्म संयोगानें कालाच्या तडाक्यांतून वाचलेले दोन चार लेख हल्लीं या इमारतींत पहावयास मिळतात. तेव्हां त्यांत काय आहे याविषयीं वाचकांचे व प्रेक्षकांचे मनांत जिज्ञासा उत्पन्न होणें साहजीक असल्यानें त्यांची थोडक्यांत माहिती येथें देणें इष्ट आहे.

येथील दोन स्तंभांवर दोन नागबंध कोरलेले आहेत. त्यापैकीं एकांत संस्कृत वर्णमाला व व्याकरणांतील सुप्तिङ्प्रत्यय दिलेले असून दुसऱ्यांत 'धातुप्रत्यय' विस्तारानें दिलेले आहेत. या नागबंधाची लिपी ११ व्या शतकांतील देवनागरी आहे. हल्लींचे शाळाप्रमाणें त्याकाळीं विद्यार्थ्यांचे सोईकरितां ही प्रत्ययमालांची कोष्टकें स्तंभावर कोरून ठेविलेलीं असावींत असें उघड दिसतें. धातुप्रत्ययमालेवर जे दोन श्लोक आहेत त्यावरून हे नागबंध भोजराजानंतर उदयादित्य व नरवर्म या नांवांचे राजे झाले, त्यांचेवेळीं कोरले गेले असावेतसें दिसतें. वर्णमालेला 'वर्णनागकृपाणिका' अशी संज्ञा श्लोकांत दिली आहे. त्याकाळीं असे सुंदर नागबंध ठिकठिकाणीं कोरून ठेविले गेले होते. यापैकींच एक हल्लीं उज्जयिनी येथें श्री महाकालेश्वराचे देवालयांत व एक होळकरशाहींतील खरगोण जवळील "उन" या गांवीं एका जीर्ण शिवालयांत अद्यापही आहे. हे नागबंध-कातंत्र नावाच्या संस्कृत व्याकरणाचे आधारें रचिलेले आहेत. हें संस्कृत व्याकरण इसवीसनाचे पहिले शतकांत सातवाहनवंशीय सप्तशतीकार जो हाल राजा होऊन गेला त्याचे एके मंत्र्यानें लिहिलें आहे, असें इतिहास-

ज्ञांचे मत आहे. हें व्याकरण फार सोपें असून त्याचे पठणपाठणाचा संप्रदाय माळवा व इतर प्रांतात मध्यकालीं फार असावा. या व्याकरणाचा पठणसंप्रदाय या माळव्यांत व इतर कांहीं ठिकाणी इतका बद्धमूल होऊन गेला आहे कीं, जुन्या पद्धतीच्या खेडेगावांतील शाळांतून अद्यापही मुलांस त्यांची पहिली कांहीं सूत्रें शिकविण्याचा परिपाठ आहे व ती शिकविलीच पाहिजेत अशी गावढ्यांतील जुन्या लोकांची भोळी समजूत आहे. या पाठास ‘ सीधा ’ असे म्हणतात. मात्र या सीध्याचे या अशा जुन्या पंतोजींकडून जे अर्थविहीन हास्यास्पद असें अपभ्रष्ट रूप झालें आहे तें पाहून संस्कृतज्ञ वाचकांस खरोखरच मोठी मौज वाटेल. म्हणून त्यांतील दोन पहिलीं सूत्रें येथें मूळ व अपभ्रष्ट रूपांसह दिली आहेत तीं अशीं:—

**मूळ सूत्रें:**—सिद्धोवर्ण समाम्नायः ॥ १ ॥
तत्र चतुर्दशादौ स्वराः ॥ २ ॥

**अर्वाचीन रूप:**—सीधो वराणा । समामुनाया ।
चत्रेचत्रे दीसा । दौसबेरा ।

यावरून लोकसमजुती कशा दृढमूल होऊन गेलेल्या असतात हें ध्यानीं येईल.

याशिवाय या इमारतींत आणखी दोन मोठाले शिलालेख चौकटी लाऊन ठेविलेले पाहण्यासारखे आहेत. या इमारतींत या शिला मेहरापींत उलट्या लाविलेल्या होत्या. त्यामुळें त्यावरील हे लेख आज आपणास पाहण्यास मिळाले आहेत. १९०२ सालीं हे लेख सहज उघडकीस आले. मेहरापींत एक भोंक पडलें होतें. त्यांतून हात घालून पाहतां या शिळांवर कांहींतरी लिहिलेले असावें असा संशय आला व म्हणून धारदरबाराकडून या शिला बाहेर काढण्यांत आल्या. व पुढें त्यांस चौकटी बसविल्या गेल्या. यांतील एका शिलेवर भोजराजकृत दोन प्राकृत कूर्मस्तोत्रें कोरलेलीं असून दुसरीवर “पारिजातमंजरी” अथवा “ विजयश्री ” नांवाच्या प्रशस्तीरूप नाटिकेचे दोन अंक कोरलेले आहेत. गुजराथेंतील चौलुक्य वंशीय राजा जयसिंहदेव याजवर धाराधिपति अर्जुनवर्मदेव यानें जो विजय मिळविला त्या विजयाचे स्मरणार्थ ही प्रशस्ती अर्जुनवर्मदेवाचे पदरीं असलेल्या बालसरस्वती मदन नामक कवीनें रचून शिलेवर कोरली होती.

याशिवाय कांहीं भग्न शिलालेखही येथें पडलेले आहेत.

या मुख्य इमारतीचे बाहेरले बाजूस लहान आवारांत मौलाना कमालुद्दीनचें कबरस्थान आहे यांत चार कबरा आहेत. त्यापैकीं एक शेख कमाल मौला किंवा मालवी याची आहे; माळव्यांत फार दिवसांपासून राहत असल्यानें त्यास माळवी असेंही म्हणत. दरवाज्यावर एक निळया रंगांत कूफी लिपींत लिहिलेला लेख आहे.

या कबरस्थानांतील लेखांत दिल्लीचा बादशहा महम्मदशहा याचे कारकिर्दीत दिलावरखान माळव्याचा सुभा होता. त्यानें ह्या दर्ग्याची दुरुस्ती हिजरी सन ७९५ ( इ. स. १३९२ ) यावर्षी केली असें लिहिलें आहे.

या इमारतीचे मागून जाणारे सडकेनें धार शहराचे वायव्येस सुमारें मैल सवा मैलावर **श्रीकालिकेचें रमणीय स्थान** आहे. हें एका लहानशा टेकडीवर असून, वर चढून जाण्यास सुमारें १५० सुंदर दगडी पायऱ्या केलेल्या आहेत. देवळांत काळया पाषाणाची कालिका देवीची भव्य व सुंदर मूर्ती आहे. या देवस्थानास संस्थानाकडून वेगळी जहागीर तोडून देण्यांत आली असून तींतून देवस्थानचा सर्व खर्च होतो. टेकडीचे खालीं जवळच एक सुंदर सरोवर आहे. तें शरदृतूंत कमलपुष्पांनीं सुशोभित झालेलें असतें. आश्वीन महिन्यांत नवरात्राचे दिवसांत नऊ दिवस येथें मोठी यात्रा भरते.

कालीकेहून येतांना डावे बाजूचे रस्त्यानें एक भव्य व सुंदर तलाव लागतो हा तलाव महापराक्रमी मुंजराजानें बनविला असल्यानें या **मुंजसागर** नांवानें लोकांत प्रसिद्ध आहे. या तलावाचे जवळच पवार राजघराण्यांतील पूर्वजांच्या छऱ्या आहेत.

येथून जवळच **धारेश्वर** नांवाचें एक प्राचीन शिवालय आहे. येथील शिवलिंगावर मुसलमानांचे हल्ले आले असल्याच्या खुणा दृष्टीस पडतात. नुकतीच दोन वर्षांपूर्वी या देवालयांत दरबाराकडून शुभ्र संगमरवरी दगडाची फरशी करविण्यांत आली असून देवालयावर सुंदर मीन्याचें काम करविलें गेलें आहे तें प्रेक्षणीय आहे.

शहरांत कै. महाराणी मैनाबाई साहेब यांनीं बांधविलेलीं दोन देवालयें **श्री आनंदेश्वराचें व श्रीदुर्गाविनायकगणपतिचें** हीं प्रेक्षणीय आहेत. हीं दोन्हीं देवालयें अनुक्रमें कै. श्री० आनंदराव पवार ( २ रे ) व त्यांच्या पत्नी महाराणी मैनाबाई ( दुर्गाबाई ) साहेब याचे नांवानें प्रसिद्ध आहेत.

तसेंच शहराचे बाहेर पूर्व बाजूस **खंडेराव टेकडी** म्हणून एक टेकडी आहे. तीवर खंडोबाचें देवस्थान आहे. येथें एक सरकारी बंगलाही आहे. हें स्थानही मोठें रमणीय आहे.

याशिवाय अलीकडील काळच्या इमारतींत **झीरापॅलेस** हवाबंगला वगैरे स्थळेंही प्रेक्षणीय आहेत.

---

## मांडू किंवा मांडव येथील स्थळें.

**मांडू** अथवा **मांडव**—याचें प्राचीन नांव मंडपदुर्ग असें आहे. हा फार जुना, भव्य व विस्तीर्ण पहाडी किल्ला असून धारचे राज्यांत धारेपासून सुमारें २२ मैलांवर दक्षिणेस विंध्याद्रीचे ओळींत आहे. मांडवास जाण्यास धारेहून टांगे मिळूं शकतात.

हा किल्ला जुना आहे. तथापि मुसलमानी आमदानीं पूर्वींचा याचा इतिहास फारसा उपलब्ध नसल्यानें हा किती प्राचीन आहे हें नक्की सांगतां येणें कठीण आहे. सहाव्या शतकांतील इराणचा बादशहा खुशरू पारवेज याचा समकालीन आनंददेव बैस यानें हा किल्ला बांधविला. असें मुसलमानी इतिहासकार फेरिस्ता म्हणतो. परंतु या आख्यायिकेस कांहीं आधार मिळत नाहीं. परमारांचें राज्य माळव्यांत नवव्या शतकाच्या आरंभापासून तेराव्या शतकाच्या अंता पावेतों सुमारें पांचशें वर्षें राहिलें. त्यांचे वेळचे लेखांत मंडपदुर्गाचा उल्लेख अनेक ठिकाणीं येतो. परमार राजा तिसरा जयसिंहदेव ( इ. स. १२६१–८० ) यानें तर मुसलमानांच्या उपसर्गास त्रासून मांडव हें आपलें राजधानीचें ठिकाण बनविलें * होतें. त्यावेळचें वर्णन अनेक जैन ग्रंथांत आढळतें त्यावरून त्याकालीं मांडव हें फार भरभराटींत असून राजमंदिरें, धनिकप्रासाद व सुरम्य सुवर्ण कलशभूषित हिंदु व जैन देवालयें यांनीं सुशोभित होतें. इसवी सनाच्या चौदाव्या शतकांत माळवा मुसलमानांच्या हस्तगत होऊन पंधराव्या शतकांत माळव्यांत

* मोठ्या मंडप दुर्गाचे शेजारी एक तटबंदी केलेली लहान टेकडी आहे. तिला बुढी ( म्हातारी–जुनी ) मांडव असें म्हणतात. त्या तटबंदींत पडलेलीं अनेक देवालयें असून कांहीं विहिरी व एक घाट बांधलेलें सरोवर आहे. हें स्थान कांहीं गैरसोईचें असल्यामुळें उध्वस्त होऊन नवें मांडव वसलें असावें. पण ही गोष्ट केव्हां झाली असेल कोण जाणे ?

मुसलमानी स्वतंत्र सुलतानांचें राज्य सुरू झालें. या सुलतानांपैकीं माळव्याचा दुसरा सुलतान हुसंगशहा घोरी यानें मांडवची तटबंदी करून त्यांत अनेक टोलेजंग धार्मिक व राजकीय इमारती बांधण्यास आरंभ केला; व पुढें शंभर दीडशें वर्षें मांडवगड हीच माळव्याची राजधानी होऊन बसली. त्या कालांतही तेथें आणखी पुष्कळ इमारती बांधविल्या गेल्या. त्यावेळच्या अद्याप कायम असलेल्या कांहीं इमारती, खिंडारे, तट, दरवाजे इत्यादि प्रेक्षकांस थक्क करून सोडतात ! व मानवी वैभवाच्या अशाश्वतेची आठवण देऊन उद्विग्न करितात !! हल्लीं मांडव येथें हिंदु वैभवकालीन एकही इमारत नाहीं, परंतु त्या पाडून त्यांच्या मसाल्यानें बांधलेल्या भव्य मुसलमानी इमारतीं बऱ्याच आहेत, त्या मांडवच्या पूर्वकालीन हिंदु वैभवाची साक्ष देतात !

या मांडव गडाचा परिघ सुमारे ४० मैल असून मुसलमानी आमदानीच्या ऐन भरभराटीच्या कालांत तत्कालिन इमारती, बाजार, रस्ते वगैरेंनी येथील जागा किती व कसकसी व्यापली होती, याचें मोजदादीचा हिशेब मालकम साहेबानीं आपले मध्यहिंदुस्थानचे इतिहासांत एका जुन्या कागदावरून दिला आहे तो येथें दिल्यास त्यावरून त्याकालीं हें शहर किती वैभवास पोचलें होतें याची बरीच कल्पना करतां येईल. " तो जागेच्या मोजदादीचा हिशेब येणें प्रमाणें.

| नांव. | चौरसबिघे. | नांव. | चौरसबिघे. |
|---|---|---|---|
| १ निमाझ गाह | २२३५ | ९ लालबाग | २०० |
| २ हमामखाने | ४०० | १० बडाबाजार रस्ते | १४७ |
| ३ लहानसान टेकड्या व डोंगर | २१५० | ११ सागर तलाव | ६१० |
| | | १२ लहान तळीं | २६३ |
| ४ बागा | ३६३ | १३ वस्ती | २२५८ |
| ५ मसजिदी | ७०५ | १४ जोतलेली जमीन | ८४५ |
| ६ लहान मोठे तलाव | ३१० | १५ जमीदाराचे इनाम | १२५ |
| ७ राजवाडे | ५०० | | |
| ८ सराई | ३०५ | एकूण चौ. बिघे | ११४१६ |

खेरीज जामन्या हुनेरी व नंदल्या हे पुरेही तटबंदीच्या आंत होते त्यांनी व्यापलेली जागा २२५८ बिघे होती म्हणजे मांडवच्या सीमेंत एकंदर १३६७४ बिघे जमीन भरते खेरीज तटाच्या भितींनी व्यापिलेली जागा दोन हजार आठशें

अडतीस बिघे आणखी यांत सोनगडचे पांचशे बिघे मिळविले तर एकंदर तटबंदीच्या आंत १७०१२ बिघे जमीन होते. हल्लीं साठ चौरस यार्डांचा माळवी बिघा आहे यामानानें पाहिलें म्हणजे मांडव येथील तटबंदीच्या घेरांत सांपडलेली जमीन सरासरी १२४६५४ इंग्लिश एकर होईल. "

या हिशेबावरून मांडवगडाचे विस्ताराचा व भव्यपणाचा ही चांगला अंदाज होईल.

इ. स. १५३१ त गुजरायचा सुभेदार बहादुर शहानें मांडवगड काबीज केला तेव्हांपासून येथील स्वतंत्र सुलतानी अमलाचा शेवट झाला त्यानंतर तीन वर्षांनीं दिल्लीचा बादशहा हुमायुन हा मांडवगडावर चालून आला. व त्याने बहादुरशहास मांडवाहून घालवून दिलें. पुढें दिल्लीची बादशाहत पठाणवंशाकडेस गेल्यावर इ. स. १५४५ त शेरशहानें माळवा काबीज केला तेव्हां त्यानें मांडवात बंदोबस्ताकरितां दहाहजार स्वार व सातहजार तोडेदार बंदुकवाले शिपाई ठेविले होतें सूरवंशाचे बादशहतीची समाप्ती झाल्यावर त्यावेळचा बादशाही सुभेदार सुजावल खान याचा मुलगा बाज बहादुर पुनः मांडवचा स्वतंत्र सुलतान झाला. इ. स. १५६१ त अकबराचा सेनापती आदमखान यानें माळवा काबीजकरून घेतला व बाज बहादुर यास येऊन घालवून लाविलें यावेळेपासून माळव्याचे सुभायतीचे मुख्य ठिकाण मांडू येथें कायम झालें.

इ. स. १५६४ व १५९८ या दोन वर्षांत बादशहा अकबर हा मांडवास आला होता तेथें आल्यावर त्यानें तेथील कांहीं इमारती पाडून टाकिल्या. इ. स. १६१६ त बादशहा जहांगिर ही कांहीं महिनें मांडवास येऊन राहिला होता. त्याचे बराबर त्याचा इंग्लिश वकील सर टॉमसरो हाही होता.*

जहांगिर बादशहानें आपले डायरींत या स्थलाचें मोठें हृदयंगम वर्णन लिहून ठेविलें आहे. त्यावेळीं येथें जंगल फार असून जंगलात सिंह, वाघ व हत्तीही असल्याचे लिहिलें आहे व बादशहा जहांगीर व नूरजहान यांनीं सिंहाची व वाघाची शिकार केल्याचें ही वर्णन दिलें आहे. हल्लीं येथें सिंह व हत्तीतर नाहींतच पण वाघही फारसे नाहींत. जहांगीर बादशहास मांडव हें ठिकाण फार आवडत असल्यानें त्यानें येथें इमारती बांधण्यांत सुमारें ३ लक्ष रुपये खर्च केलें व येथें राहून पुष्कळ विलास भोगले. जहांगीर येथून खबूतराबराबर

* सर टॉमसरो राहत होता तें ठिकाण हल्लीं लालकोठी या नावानें लोकांत प्रसिद्ध आहे.

बऱ्हाणपुरास पत्रें पाठवीत असे. मांडवाहून ती कबूतरें ७॥ तासांत बऱ्हाणपुरास जात असत आणि हवा चांगली असली तर ती तीन तासांत पोचूं शकत.

इ. स. १६२३ त राजपुत्र खुर्रम ऊर्फ शहाजहान यानें बादशहा जहांगीर याचे विरुद्ध बंड केलें त्यावेळीं मांडवचे किल्याचा त्यानें आश्रय केला होता व पुढें दिल्लीचा बादशहा झाल्यावर ही इ. स. १६३५ त त्यानें येथें पावसाळा घालविला. पुढें इ. स. १६९६ पासून मांडवगडांवर मराठ्यांचे हल्ले होऊं लागून इ. स. १७०९ त प्रथमतः पवार घराण्यांतील महाप्रतापी पुरुष उदाजीराव यांनीं मांडव गडावर आपलें निशाण लाविलें अखेरीस इ. स. १७३१।३२ त मांडवगडावर पवार घराण्याचा पूर्ण अमल झाला.

आतां येथें, हल्लीं मांडवास असलेल्या मुख्य मुख्य प्रेक्षणीय स्थलांची अनुक्रमानें थोडक्यांत माहिती देऊंः—

मांडव येथील या इमारती पहावयास जाण्यास हल्लीं किल्याच्या बाजूनें जो रस्ता गेला आहे तो सोपा व सोईचा आहे. या रस्त्यानें गेलें असतां **हिंदोळा महाल, चंपाबावडी, दिलावरखानाची मस्जीद, जहाजमहाल,** आणि **तवेला महाल** हीं लागतात, त्यापुढें याच रस्त्याच्या शेवटच्या टोकापर्यंत गेलें म्हणजे **रूपमतीचा महाल व बाजबहाद्दराचा राजवाडा** दृष्टीस पडतो व परत येताना सागर तलावाचे समोरचे बाजूस **मलीक मुघीज** याची मशीद व दुसऱ्या कांहीं इमारती लागतात. तेथून पुढें **जामीमस्जीद चर्वीमस्जीद** ( हुसंगशहाची कबर ) व **मदरसा** पाहून परत बिऱ्हाडीं येतां येतें. याशिवाय ही कांहीं स्थळें आणखीं पाहण्यासारखीं आहेत परंतु तीं दूर दूर असल्यामुळें येथें दोन चार दिवस मुक्काम केल्या वांचून पाहतां येणें शक्य नाहीं.

वरील क्रमाप्रमाणें इमारतींचे वर्णन खाली दिलें आहे.

## दरवाजे.

या किल्यास अनेक दरवाजे आहेत परंतु मुख्यतः वरील मार्गांत तीनच दरवाजे प्रेक्षकांचे दृष्टीस पडतात. प्रथम

### अलमगिर दरवाजा

लागतो. ह्यावर एक शिलालेख आहे तो खान महम्मद बेगखान यानें हिजरी सन १०७९ ( इ. स. १६६८ ) यावर्षीं यादरवाजाची दुरस्ती केल्या संबंधाचा

आहे. या दरवाजा पासून पश्चिमेकडे जाणारा फरसबंदीचा जुना रस्ता ज्या दरवाज्यांतून गेला आहे त्यास भंगी दरवाजा असें नांव आहे ह्यास हें नाव या दरवाजाचे पायांत भंगी चिणून टाकला असल्यामुळें पडलें आहे असें सांगतात. तिसरा

## दिल्ली दरवाजा

हा हिंदोळया महालाजवळ असून पठाण लोकांच्या कौशल्याचा उत्तम नमूना आहे. हल्लींचा रस्ता गाडी दरवाजांतून गेला आहे.

## हिंदोळा महाल.

ही इमारत बांधण्यांत कारागिरांनीं बरेंच चातुर्य दाखविलें आहे इच्याभिंती पैलूदार निमुळत्या असून झुकलेल्या दिसतात यामुळेंच या इमारतीस ‘ हिंदोळा महाल ’ हें नाव मिळालें आहे. यांतील मोठा दिवाणखाना पाहिला म्हणजे आक्स फर्ड कालेजांतील ‘ डायनिंग हॉल ’ ची आठवण होते असें युरोपियन प्रेक्षक म्हणतात. या इमारतीच्या एका टोंकास पूर्वी एक सज्जा असून त्यास दगडाच्या कोरीव जाळया लाविलेल्या होत्या त्यांतून सुलतानाच्या गोषांतील स्त्रियांस बाहेरील मौज पाहतां येत असे.

## नाहार झरोका,

वरील इमारतीच्या उत्तरेस नहार झरोका आहे. ह्या इमारतीच्या उत्तरेकडील बाजूस एक सुंदर संगमरवरी दगडाची खिडकी आहे. ती वरून या इमारतीस नाहार झरोका हें नाव मिळालें आहे या खिडकींतून मांडव येथील सुलतान, लोकांच्या अर्ज्या ऐकत असत व दरबारी मंडळींचे सलाम घेत असत.

## चंपा बावडी.

नाहार झरोक्याचे मागील बाजूस ही विहीर जमीनीच्या अंतर्भागांत बांधलेली आहे इच्यांत मागील बाजूस ‘ तहखाने ’ म्हणजे जेथें शीत किंवा उष्ण हवेची बाधा होणार नाहीं अशा जागा बांधलेल्या आहेत. तसेंच येथें जवळच हमामखाने ( स्नानगृहें ) होतीं, तीं हल्लीं अगदीं मोडकळीस आलेलीं आहेत. त्या काळीं असल्या प्रकारचीं स्थळें राजवाड्यानजीक असणें हें अत्यंत जरूरीचें समजलें जात असे.

## दिलावर खानाची मस्जीद.

ही सुंदर मस्जीद प्राचीन हिंदु व जैन मंदिरांचा विध्वंस करून त्यांचे अवशेष ही इमारत बांधण्याचे कामीं उपयोगांत आणिले आहेत. तीवर एक शिला-

लेख आहे त्यात " ही मस्जीद भविष्य वाद्यांचा शिरोमणी, सर्वत्रांचा आश्रय-दाता, अत्यंत वैभवशाली, आणि देवदूताप्रमाण सुंदर अशा नासिरुद्दीन दिलावर खानानें हिजरी सन ८०८ ( इ. सन १४०५ ) यावर्षी बांधिली" असे लिहिलें आहे.

## जहाज महाल.

ही इमारत तलावाच्यामध्यभागीं बांधली असल्यानें तिला हें नांव मिळालें आहे. पूर्वीच्या काळीं तलावाचें पाणी इमारतीचे भिंतीस लागत असलें पाहिजेसें दिसतें. या इमारतीचे आसपास कित्येक महालांचे अवाशिष्ट भाग हल्लीं झाडा झुडपांत आच्छादिलेले दिसतात. येथून जवळच रस्त्यावर असलेली इमारत तबेला महालही मांडवचा विलासी सुलतान गयासुद्दीन ( इ. स. १४६९–१५०१ ) याच्या जनान खान्याची जागा होती असें म्हणतात. हा सुलतान फार विषयासक्त असून याचे जनान खान्यांत पांचशें सुंदर स्त्रिया होत्या.

येथून निघतांच हुषंगशहाचे मशीदीचे बाजूनें एक सुंदर रस्ता उंच कड्याच्या टोंकाकडेस गेला आहे. हा कडा म्हणजे माळव्याची अगदीं दक्षिणसीमा असून त्यावर मांडवचा शेवटचा सुलतान बाज बहादूर ( १५५४–६२ ) याची प्रियतमा रूममती इचा महाल आहे. आणि खालीं रेवा कुंडा जवळ बाजबहादुराचा स्वतःचा महाल आहे.

ही इमारत कधीं बांधली वगैरे संबंधाने कांहीं विशेष माहिती उपलब्ध नाहीं परंतु बाजबहादुरचे महालावर एक शिलालेख आहे त्यांत ती इमारत माळव्याचा सुलतान नासिरुद्दीन यानें हिजरी सन ९१४ ( इ. स. १५०८–९ ) यावर्षी बांधल्याचा उल्लेख आहे. कदाचित बाजबहादूरानें ही इमारत आपले राजमहाल-प्रमाणें उपयोगांत आणली असावी व यामुळेंच तिला बाजबहादूराचा राजमहाल हें नाव मिळालें असावें.

राणी रूपमती व बाजबहादूर यांच्या प्रेमसंबंधाची एक अद्भुत गोष्ट प्रसिद्ध आहे ती वाचकास चांगली मनोरंजक वाटेल म्हणून येथें दिली आहे.

---

१ राणी रूपमतीसंबंधाची ही हकीगत प्रसिद्ध इतिहास संशोधक रावबहादूर पारसनीस यांणीं आपल्या इतिहाससंग्रह मासिकांत दिली आहे. तींतील आवश्यक वाटला तेवढा भाग येथें दिला आहे.

" राणी रूमपती इचा जन्म उज्जयनीच्या इशान्येस ५५ मैल अंतरावर असलेल्या सारंगपूर नामक गावीं झाला. तिच्या आईबापांची हकीगत चांगलीशी उपलब्ध नाहीं. सरजॉन मालकम याणीं असें लिहिलें आहे कीं ही सारंगनयना सारंगपूरची एक नृत्यांगना होती. दुसऱ्या एका इंग्रजग्रंथकारानें लिहिलें आहे कीं, ती मंडलेश्वराजवळील रेवा तीरच्या एका रजपूत ठाकुराची मुलगी होती परंतु येवढें निश्चित आहे कीं, ती अत्यंत सौंदर्यवती असून तिला संगीत शास्त्राचे चांगले ज्ञान होतें तिचा आवाज तर इतका मधुर होता कीं, तिच्या मंजुल आलापलहरी ऐकून सहृदय अंतःकरण वेधून गेल्यावाचून राहत नसे "

" बादशहा बाजबहादुर हा एके दिवशीं नर्मदेच्या काठीं सृष्टिसौंदर्यानें मंडित अशा एका वनप्रदेशामध्यें शिकारीस गेला होता, त्यावेळीं रूपमती ही रेवातीरी आपल्या मंजुल स्वरानें निसर्गदेवतेचे स्तवन करीत, एका वृक्षांखाली बसली होती. तिच्या संगीताचा सुस्वर ध्वनी बाजबहादुराच्या श्रवणीं जातांच तो अगदीं तल्लीन होऊन व दर्शनोत्सुक होऊन ह्या सौंदर्यलतिकेजवळ येऊन दाखल झाला. नंतर त्यानें तिचें दर्शन घेतलें. तिच्या गानमाधुर्यानें त्याचें अंतःकरण जितकें वेधलें त्यापेक्षां तिची लावण्यकांति अवलोकन करून तो सहस्रपटीनें तिजवर प्रेमानुरक्त झाला. नंतर त्यानें तिला आपल्याबरोबर लग्न लावून आपली पट्टराणी होण्याविषयींची इच्छा प्रदर्शित केली त्यावेळीं तिने बादशहास असें सांगितलें कीं, " मी रजपूतवीराची कन्या आहे, मला मुसलमानाशी लग्न लावणें शक्य नाहीं. " नंतर बादशहानें तिची अनेक प्रकारें विनवणी केली तेव्हां तिनें त्यास निक्षून सांगितलें कीं, ' तूं जर ह्या पवित्र नर्मदानदीस मांडवगडावर नेऊन तेथून तिचा प्रवाह वाहत जाईल असें करशील तर मी तुझी पट्टराणी होईन. " मांडवगड हें ठिकाण नर्मदाप्रवाहापासून बाराशें फूट उंच असल्यामुळें तेथें नर्मदाप्रवाह येणें शक्यच नव्हतें; तथापि बादशहानें आपल्या राज्यांतील सर्व संपत्ति व सर्व साधनें उपयोगांत आणून हें अचाट कृत्य सिद्धीस नेण्याचा निश्चय केला; व लागलींच मांडवगड फोडून नर्मदाप्रवाह वर आणण्यास सुरवात केली प्रेमाकरितां मनुष्य काय न करील ?

बादशहाचें निस्सीम प्रेम व त्याचा चमत्कारिक पण पाहून साक्षात् श्री रेवानदी त्याच्या स्वप्नांत आली, व तिनें बादशहास असा दृष्टांत दिला कीं,

"तुझें रूपमतीवरील निस्सीम प्रेम पाहून मी प्रसन्न झाल्यें. तूं आतां व्यर्थ खटाटोप करूं नको. मांडवगडावर जेथून माझा प्रवाह दिसतो तेथें जवळच तूं खणून पहा. तेथें तुला माझ्या प्रवाहाचा झरा सांपडेल. ती साक्षात् रेवानदी आहे असें समज व तेथें तुझा व तुझ्या प्रणयपात्र रूपमतीचा प्रीतिसंगम होऊं दे" असा श्रीरेवानदीचा दृष्टांत झाल्यावर बादशहानें रूपमतीस तेथें आणिलें व तिची खात्री करून देऊन तिच्याशीं विवाह केला. हें रेवाकुंड अद्यापि अस्तित्वांत आहे.* व ह्याच्या नजीकच बाजबहादुराचा राजवाडा व रूपमतीचा महाल हेही विपन्न स्थितींत अद्यापि आहेत. रूपमतीच्या महालापासून दिसणारा दूरांतरावरील पवित्र नर्मदानदीचा प्रवाह व वनश्रीचा रमणीय देखावा फारच उदात्त व चित्ताल्हादक आहे. *

राणी रूपमती इचें बाजबहादुराचे ठिकाणीं इतकें शुद्ध व अचल प्रेम होतें कीं, तिनें त्याजवर नानाप्रकारचीं पद्यें रचिलीं आहेत. हीं पद्यें हिंदी भाषेंत असून तीं माळव्यांतील कर्णप्रीय लोकगीतें होऊन राहिलीं आहेत. ज्या वेळीं बाज बहादुर मृत्यू पावला असें ह्या राणीस कळलें, त्या वेळीं तिनें पुढील दोहा म्हणून प्राण सोडिला:—

तुमबिन जियरा रहत रहत मांगत है सुखराज।<br>
रूपमती दुखिया भयी, बिना बहादुर बाज॥

ह्या राणीनें सुप्रसिद्ध भूप कल्याण राग शोधून काढिला असें म्हणतात. असो, राणी रूपमती ही एक अद्वितीय स्त्री होऊन गेली व तिनें आपल्या संगीत कलेनें व अलौकिक पतिप्रेमानें आपलें नांव माळव्याच्या इतिहासांत अजरामर करून ठेविलें आहे यांत कांहीं शंका नाहीं.

सुजालपूरच्या काजीसाहेबांजवळ एक तवारिख आहे तींत अशी हकीगत दिली आहे कीं, बाज बहादुर बादशहाच्या पदरीं मानखान ह्या नावाचा एक

---

* रेवाकुंडात साक्षात् रेवानदीनें येऊन प्रवेश केला या आख्यायिकेवर इकडील लोकांचा विश्वास आहे व त्याप्रमाणें नर्मदा प्रदक्षिणा करणारे नर्मदावासी प्रदक्षिणेचे वाटेंत एकदा मांडवास नर्मदानदीचे दर्शनाकरिता येतात असेही समजतें.

रूपमती महालावरील बंगल्याविषयीं असें सांगतात कीं तेथून रूपमती प्रत्यक्ष रेवानदीचें दर्शन घेत असे. कारण रेवादर्शन झाल्याशिवाय अन्नग्रहण करावयाचें नाहीं असा तिचा नियम होता.

गवई होता तो अकबर बादशहाकडे गेला व त्यानें रूपमतीच्या सौंदर्याची महती बादशहा जवळ वर्णन केली. बादशहानें बाजबहादुरास रूपमतीला दिल्ली येथें पाठविण्याबद्दल पत्र लिहिलें तें पाहून बाजबहादुरास फार राग आला; व त्यानें दिल्लीपतीचा उपमर्द करून असें उत्तर पाठविलें कीं, तुमच्या जनानखान्यांतील महाराणी धोकलबाई हिला आमच्याकडे दोन महिने पाठवावें; म्हणजे राणी रूपमतीस तुमच्याकडे पाठवून देऊं. हें उत्तर ऐकून बादशहास फार क्रोध उत्पन्न झाला व त्यानें सारंगपुरावर सैन्य पाठवून बाजबहादुरचा पराभव केला. व त्यास धारातीर्थी पाठवून त्याचें राज्य जिंकून घेतलें.

राणी रूपमतीच्या कविता अद्यापि प्रसिद्ध झाल्या नाहींत परंतु एक दोन संशोधक इंग्रज ग्रंथकारांनीं ज्या कांहीं भाषांतर रूपानें प्रसिद्ध केल्या आहेत त्यापैकीं जनरल कनिंग हॅम यांचें पुढील भाषांतर फार मनोरम आहे रूपमतीनें बाजबहादुरास आपल्या प्रेमाचें महत्व वर्णन केलें आहे.

Friend ! let others boast their treasure,
Mine's a stock of pure love's pleasure
Safely cared for every part
'Neath that trusty lock my heart
Safe from other women's peeping
For the key's in my own keeping
Day by day it grows a little
Never loses e'en a tittle
But through life will ever go
With Baz Bahadur, weal or woe !

या भाषांतराच्या मूळ हिंदी गजलाचा शुद्ध पाठ मिळाला नाहीं. तथापि जसा मिळाला तसा वाचकांकरितां खालीं उतरून घेतों.

और धन जोडता है, री, ।
मेरे तो धन प्यारे की प्रीत पूंजी ।
आनेका जतन कर राखों मनमें ।
तू परतीत तारो दे ।
काहूं त्रियाका न लागे दृष्ट ।
अपने कर रखोंगी कुंजी ।

दिन दिन बढे सवायो डोढो ।
घटे न एको गुंजी ।
बाज बहादुरके सनेह ऊपर ।
निछावर करुंगी धन और जी ।

याचें तात्पर्य असें:—

प्रियकरा ! दुसरे धन जोडतीलतर जोडोत बापडे ! माझे तर सर्वस्व प्रियकराच्या प्रीतीचें भांडवल हेंच आहे. यांस मी माझ्या मनाच्या मंजूषेंत (पेटींत) जतनकरून ठेवीन अशी तूं खात्री बाळग.

कोणां दूसऱ्या स्त्रीची दृष्ट लागूं नये म्हणून मी त्या पेटीची किल्ली सदैव आपले हातांत बाळगीन.

ती प्रेमाची पुंजी अनुदिन सवाई दिढीनें वृद्धींगत होते, पण गुंजभर देखील कधीं कमी होत नाहीं.

बाज बहादुराच्या स्नेहावरून मी आपले धनच काय पण जीवन देखील ओवाळून टाकीन.

राणी रूपमती संबंधाने दुसरी आख्यायिका अशी आहे कीं, बादशहानें रूपतीशी विवाह करण्याचा निश्चय केला. ही गोष्ट तिचा बाप जो धर्मपुरीचा ठाकूर त्यास कळली तेव्हां त्यानें रजपुताच्या मुलीनें मुसलमानाशीं विवाह करण्यापेक्षां विष प्राशन करून नर्मदा तीरीं आपला प्राण नाश करणें चांगलें असें समजून, त्यानें तिच्याकरितां विषाचा प्याला तयार करविला; व नर्मदा तीरीं तो तिला प्राशन करण्यास देऊन तिच्या सुकुमार शरीराची रक्षा नर्मदा प्रवाहांत टाकण्याचा निश्चय केला. ज्यावेळीं तो विषाचा प्याला तिजपुढें आला त्यावेळीं तिनें नर्मदेची प्रार्थना करून कांहीं पद्यें म्हटलीं. तिचा मधुरस्वर ऐकून बादशहा दैव गतीनें तेथें अकस्मात प्राप्त झाला व त्यानें रूपमतीची सुटका करून तिला आपल्या राजवाड्यांत नेलें ह्या प्रसंगी तिनें जीपद्यें म्हटली त्यापैकीं दोन पद्यांचा आशय एका इंग्रज ग्रंथकारानें इंग्रजी मध्यें दिला आहे तो वाचनीय आहे.

King of the crystal depths ! Ah ! where,
Nurbudda, shall thy sparkling wave.
The young Rajpootanee's ashes bear ?
Leave them where thy ripples lave

The emerald marge, and lilies wave
Their death less petals. Let the chime.
Of thy glad wave sound o'er her grave,
Cut of in vergin prime "

*          *          *          *          *

" And if, perchance, of foreign blood
But kindred soul, a warrior come
To ponder o'er thy twilight flood,
And seek the form for ever gone,
Tell him the maid of Rajstan,
True to her faith nor false to him
Thus binds her bridal garland on,
Cut down in vergin prime. "

हे देवी नर्मदे तुझ्या स्फटिक मणितुल्य गहन उदकांत त्या राजपूत तरुणीची रक्षा तूं कोठें ठेवशील बरें ? हे देवी जेथें तुझ्या जललहरी पाचाप्रमाणें हिरव्या गार तटांस स्नान घालितात. व जेथें सदा प्रफुल्ल जल कमलें निरंतर डोलत असतात. तेथें त्या रक्षेस स्थान दे, म्हणजे तारुण्याच्या ऐन भरांत गतप्राण झालेल्या त्या कुमारीच्या समाधीवरून तुझे आल्हादकारक निर्झर मंजुळ ध्वनी करीत करीत झुळझुळ वाहतील. आणि जर कदाचित कोणी सहृदय परदेशी वीर सायंकालीं तुझ्या पवित्रोदकाचें दर्शन करण्यास आला आणि दृष्टिपथास अगोचर झालेल्या त्या लावण्यवतीचें रूप पाहण्याची त्यास इच्छा झाली तर निवेदन कर की ती रजपूत राजकुमारी पतिपदकमलीं अनन्य लीन होती, पण ऐन तारुण्यांत ती निर्दय काळाचे तावडींत सांपडली. व आतां येथें आपली विवाहमाला या पुष्पवाटिकेंत गुंफीत आहे.

हें हृदयद्रावक चरित्र वर्णावें तितकें थोडेंच.

एका युरोपियन लेखकाचे राणी रूपमती विषयींचे पुढील उद्गार प्रसिद्ध आहेत ते रसिक इंग्लीश भाषाभिज्ञ वाचकाकरितां येथें उतरून घेतल्यावांचून रहावत नाहीं.

" * * * She was a high-minded woman, who did not choose to survive the loss of her honour, and who bore such an enthusiastic attachment to her Lord that she deemed her

existeance in supportable without him. The end of her career has some resemblance to that of Cleopatra, but her history is more romantic as well as much more moral To a great extent her experience may be compared to that of Sappho. Both were gifted with a high poetic vein, and both were ardently fond of the object of their loves; and the sad end of both proceeded from pining and separation. They have both left behind them the most impassioned poetry to cherish the memory of their names. The songs of Rupmati are still sung all over Malva; and their simple natural style, from the genuine outpourings of a fervent heart."

The Calceutta Review.

रूपमतीचे चरित्र अनेक भाषेंतील अनेक ग्रंथकारांनीं गाईलें आहे. इंग्रजींत या संविधानकावर रचलेले एक काव्य ही आहे.

बाज बहादुरच्या * महालाकडून त्याच रस्त्यानें परत येतांना सागर तलावाजवळ **मुघीजउद्दीनची** मशीद लागते. ही मशीद महम्मद खिलजीचे बापाची आहे. या इमारतीचें खरें नांव हुमायुनखानची मशीद असें आहे. या मशीदीचे पूर्व दरवाजावर शिलालेख आहे त्यांत ही मशीद शुक्रवार ता. ४ रज्जब हिजरी सन ८३५ ( ७ मार्च १४३२ ई. ) रोजीं बांधल्याचें लिहिलें आहे.

ही मशीद धार येथील लाट मशीदी सारखी विशाल असून हिंदु अथवा जैन मंदिरांचा उच्छेद करून त्यांचें सामान उपयोगांत आणून बांधिली आहे. पूर्वेकडील दरवाजा अत्यंत सुंदर होता या इमारतीची बनावट फार उत्तम आहे.

या मशीदीजवळ दोन घुमटी एक इमारत आहे तिला " दाईका महाल " व ' दाईके छोटी बेहनका महाल ' असें म्हणतात या संबंधानें विशेष माहिती नाहीं. सडके वरील खिरणीचे झाडापासून मोठ्याने बोलल्यास या महालांतून प्रतिध्वनि निघतो. त्यामुळें येथें प्रेक्षकांस थोडी मौज वाटते.

---

* या महालाची दुरुस्ती करून त्यांत श्रीमती राणी मैनाबाई साहेब पवार राहात होत्या. व तेथेंच त्यांचा पुत्र रामचंद्रराव पवार याचा जन्म झाला असें जुने लोक सांगतात.

## जामी मस्जीद

ही पठाण कौशल्याचा उत्तम नमूना असून हिची बांधणी साधी व ठोंसदार आणि सुंदर आहे. या इमारतीवर लेख आहे, त्यांत ही इमारत बांधण्यास हुसंगशहानें सुरवात केली व महम्मद खिलजींनें कामपुरें केलें. असें लिहिलें असून काम पुरें झाल्याचा सन हिजरी ८५८ ( इ. स. १४५४ ) हा आहे. या इमारतीचे मागें

## चर्वा मस्जीद.

आहे हिच्यात मांडवचा सुलतान हुषंगशहा याची कबर आहे हिच्या घुमटांत चार चर्वे ( हंड्या ) लाविले असल्यानें तिला चर्वामस्जीद हे नांव मिळालें आहे. या इमारतीचा घुमट शुभ्र संगमरवरी दगडाचा असून संदर आहे.* डावे बाजूचे खांबावर एक लेख आहे. त्यात ता. ९ रजब हिजरी १०७० ( १४ डिसेंबर १६५९ ) दिली आहे.

## धरमशाला.

ही हिंदु देवालयांचे अवशेषांची बनविलेली आहे. आणि हीची बांधणीही हिंदु पद्धतीची आहे.

## महम्मदखिलजीचा मुकरबा

ही एक मोठी भव्य इमारत होती. हल्लीं तिचा पाया मात्र राहिला आहे. बहुधा ह्या इमारतींत महमूदखिलजी याची कबर आहे येथें एक लेख सांपडला आहे त्यांत हिजरी सन १०१४ मोहरम ( मे १६०५ ई. ) दिला आहे.

या इमारतीचे इशान्य बाजूस एका वर्तुळाकार इमारतीचा अवशिष्ट भाग दिसतो आहे. तो महमूद खिलजी यानें चितोड येथील राणा कुंभ याचेवर विजय मिळविला त्याचें स्मारक म्हणून इ. स. १४४३ त बांधला होता. हा सात मजली होता म्हणून यास ‘ हप्तमंजल ’ असेंही म्हणत असत. हा वर्तुळाकार बांधलेला असून ह्यास चढून जाण्यास वर्तुळाकार १७० पायऱ्या होत्या. या इमारतीचें काम मोठें प्रेक्षणीय होतें ही इमारत सर्व संगमरवरी दगडांची बांधली होती. या इमारतीचें दुसरें नांव अशरफी महल हें होतें. युरोपियन लोकांतही Jower of victery या नांवानें प्रसिद्ध आहे. ही विद्युत्पातानें किंवा

*ही संगमरवरी इमारत पाहून ताजमहालची आठवण होते आणि उभयतांतील शिल्पाचें अंतर लक्षांत येतें. ही पठाणी इमारत भव्यपण अत्यंत साधी असून आगऱ्याचा ताजमहाल सौंदर्याचा व नक्षीचा अप्रतिम नमून आहे.

दुसऱ्या कांहीं कारणानें जमीनदोस्त होऊन गेली होती. पण १९०३ सालीं प्राग्वस्तुसंशोधन खात्यांतील अधिकारी मि. कझन्स यांनीं पुष्कळ मेहनत करून तें स्थल पुनः निदर्शनास आणिलें आणि या "हप्तमंजिल" म्हणजे सात मजली बुरूज किंवा मिनोरा याची जागा कायम केली व मांडवाचा सुलतान महमूद खिलजी याच्या कबरेस या पडलेल्या इमारतीच्या ओझ्यापासून सोडविलें.

याशिवाय **रामपोल** हा दरवाजा फार प्राचीन आहे.

**तारापुर दरवाजा** या दरवाजावर दोन लेख आहेत. एकांत हा दरवाजा माळव्याचा सुलतान दिलावरखान घोरी यानें हिजरीस ८०७ ( इ. स. १४०५ ) यावर्षीं शादियाबाद ( हें मांडवचे मुसलमानी वेळचें नांव ) येथें बांधला असें लिहिलें असून दुसऱ्यांत ताहिर महम्मद हुसेन इमादउद्दीन बादशहा अकबरचा इंजिनीयर यानें मोहरम हिजरा १०१४ ( मे १६०५ ई. ) या दिवशीं या दरवाजाची दुरुस्ती केली असा उल्लेख आहे.

**सोनगड दरवाजा**:—येथून एका सुंदर निमुळत्या टेकडीवर जाण्याचा रस्ता आहे. ही टेकडी एक किल्ल्याचे बचावाची जागा आहे येथूनच गुजराथचा बहादुरशाहा व दिल्लीचा बादशहा हुमायुन या दोघांनींही मांडवगडावर हल्ला केला. हल्लींचा दरवाजा हा अर्वाचीन आहे तो आनंदराव पवार २ रे यांच्या पत्नी राणी मैनाबाई साहेब यांनीं १९ व्या शतकांत बांधिला.

**लवाणी दरवाजा** या दरवाजा जवळ हिंदू इमारतीचे कांहीं अवशेष पडले आहेत. दुसरे जहांगीर पुरा आणि भगवान्या—नांवाचे ही दोन दरवाजे आहेत.

## नीलकंठेश्वर ( नीलकंठ )

ही मुळची एक मुसलमानी इमारत आहे या रमणीय एकांत स्थलीं पुढें येथें एक शिवलिंगाची स्थापना झाली आहे. येथें डोंगरांतून पाणी वाहत येऊन एके कुंडांत पडतें. येथें सभोवतीं वनश्रीचा देखावा फार रमणीय आहे. हें स्थान बादशहा अकबरचे वेळीं हिजरी सन ९८२ ( इ. स. १५७४ ) यावर्षीं बांधलें आहे.

येथें आणखी २।३ पर्शियन लेख आहेत. पश्चिम बाजूचे भिंतीवरील लेखांत "अकबर बादशहा हि. स. १००८ ( १५९८–९९ ) सालीं दक्षिणेंत स्वारीवर जात

असतां येथें राहिला होता असें लिहिलें असून पूर्वेकडील भिंतीवरचे लेखांत हि. स. १००९ ( इ. स. १५९९ ) या वर्षी दक्षिणखानदेश काबीज करून परत जातेवेळीं येथें थांबून पुढें त्यानें हिंदुस्थानांत कूच केलें असें लिहिलें आहे. त्यांत एक कविता आहे तींतः—

पूर्वीच्या होऊन गेलेल्या राजांचे थडग्यावर रात्रंदिवस घुबडें बसून शोक करीत असतात ! व दुःखानें कळवळून ती संपत्ति, ती भरभराट, ती सत्ता कोठें गेली ! ! व ते वैभवशाली राजेही कोठें गेले अशी ओरड करीत असतात ! ! !

असा आशय आहे तो वाचून भर्तृहरीच्या " सारंम्यानगरी " या श्लोकाची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. आणि या लेखावरून अकबराचे वेळीं म्हणजे बाजबहादुरांच्या मृत्यूनंतर थोडक्याच दिवसांनीं मांडव हें स्थानओसाड होऊन गेलें होतें असें दिसतें* तसेंच हामामखाना या इमारतीस मोठाले भव्य चार खांब आहेत.

**दर्याखानची कबर** जामीमस्जीदपासून सागर तलावाकडेस जाणाऱ्या रस्त्यावरती आहे.

**चेस्तीखानचा महाल**—चेस्तीखान हा महम्मद खिलजीचा फौजेवरील अधिकारी होता.

**बहादुरशहाचा मदरसा**—जहाज महालच्या पश्चिमेस जंगलांत आहे.

याशिवाय येथें एक श्रीरामाचें देवालय आहे. देवालयांतील श्रीरामचंद्राची मूर्ति चतुर्भुज असून भव्य व सुंदर आहे. ही मूर्ति बरीच प्राचीन आहे असें म्हणतात. मुसलमानी आमदनींत या मूर्तीस मुसलमानांचे धाकामुळें कित्येक वर्षें भुयारांत काढावीं लागलीं होतीं असें सांगतात. पुढें महापराक्रमी राजे यशवंतराव पवार यांच्या पत्नी राणी सौ. सकवारबाईसाहेब यांनीं हें मंदिर संवत १८२६ शके १६९१ या वर्षी बांधून त्यांत या मूर्तीची पुनः प्रतिष्ठापना केली, व पूजा, नैवेद्य, सदावर्त इत्यादि खर्चाकरितां जहागीर गांव करून देण्यांत येऊन या देवस्थानाची देखरेख एका महंताकडे देण्यांत आली. त्यांचे शिष्य अद्याप त्या देवस्थानचे प्रमुख मानले जातात.

---

* इतक्या अल्पावकाशांत मांडवासारखी भव्य राजधानी उध्वस्त होऊन गेली याचें आश्चर्य वाटतें. परंतु नगरवासियांकरितां स्वाभाविक लागणाऱ्या सोयींचा अगदीं अभाव असतां, केवळ राजांच्या सोईकरितां कृत्रिम प्रयत्नानें उभारलेल्या नगरीची दुर्दशा राजांच्या दुर्दशेबरोबर व्हावी हें साहजीकच आहे.

श्रीरामजीचे समोर गरुडाचें लहान देऊळ आहे. त्यांत एक संगमरवरी सूर्याची मूर्ति आहे. ती प्राचीन दिसते. आणि पूर्वी सूर्याराधनेचा प्रचार या प्रांतांत विशेष होता, याची साक्ष ती मूर्ती पटविते.

तसेंच मांडव येथें नवीन जैनमंदीर झालें आहे. त्यांत पुष्कळ प्राचीन प्रतिमा आणून बसविल्या आहेत. मुसलमानांनीं जैन मंदिराचा विध्वंस केला, तेव्हां भाविकांनीं मंदिराची आशा सोडून पुष्कळ प्रतिमा भुयारांत व भूगर्भात लपवून ठेविल्या, त्यापैकीं कांहीं मूर्ति कांहीं वर्षांपूर्वी या मंदिराचे आवारांतच पुरलेल्या सांपडल्या. आणि मुख्य सुवर्णप्रतिमा श्रीरामजीबरोबर भुयारांत वास करीत होती, तिचा उद्धार जेव्हां महंतानें श्रीरामजीबरोबर केला, तेव्हां जैनांनीं दरबारांत अर्ज करून ती मूर्ति हस्तगत करून घेतली. आणि थोडयाच वर्षांपूर्वी मंदिराचा जीर्णोद्धार करून त्यांत तिची प्रतिष्ठा केली. तेव्हांपासून मांडवच्या जुन्या जैनक्षेत्राचा उद्धार झाला आहे. जैनांच्या पुण्यक्षेत्रांविषयीं एक स्तोत्र आहे. त्यांत मांडवची गणना होते. तें असें—

> **मांडव** गडनो राजियो नामे देव सुपार्श्व ।
> **रिखभ** कहे जिन समर्ता पोचे मननी आस ॥
> **शत्रुंजय** ( पालिठाणा ) श्री आदिदेव नेम् नमू **गिरनार** ( जुनागड ) ।
> **तारंगे** ( महिसाणा ) श्री अजितनाथ **आबू** ( गड ) रखभ जुहार ॥
> **अष्टापद** ( मारवाड ) गिरीउपरे जिनचोविसेजेऊ ।
> मणिमयमूरत मानषू भरत भरावी सोय ॥
> संमत् शिखर तीरथ बडो ( बंगाल ) ज्याबीसे जिनपाय ।
> वैभाव गिरीऊपरे धीर जिनेश्वरराय ॥

याशिवाय मांडव येथें अनेक प्रेक्षणीय स्थळें आहेत. परंतु विस्तारभयास्तव त्या सर्वांचें वर्णन येथें करतां येत नाहीं. तथापि सातसोपेढी कटेपान वगैरे स्थळें साधल्यास प्रेक्षकांनीं माहीतगारांस बरोबर घेऊन पहावीं.

# हल्लींच्या पवार राजघराण्याचा वंशवृक्ष.




C. N. Press, Bombay.

